किंमतवान् अंगठी बघून त्या वाण्यानें ताडिलें कीं, हा कोणी तरी मोठ्या घराण्यांतला मनुष्य असून कांहीं प्रसंगामुळें अशा स्थितीस आला आहे. ह्मणून त्याणें पृथ्वीराजाकडे विशेष चौकशी केली. तेव्हां त्याला समजलें कीं, हा राजपुत्र असून क्षात्रबीजाचा आहे. ह्मणून त्याणें त्याला आश्रय देऊन अशी मसलत दिली कीं, 'हल्लीं अरवली डोंगरांतील मेणा जातीच्या रानटी भिल्लांनीं फार दंगा मांडिला आहे, तर त्यांचें पारिपत्य केल्यास गोदवाडचा बराच भाग जो त्या लोकांकडे आहे तो तुह्मांस मिळेल.' परंतु त्या वाण्याच्या ह्या मसलतीप्रमाणें गोष्ट व्हावी कशी ? असा पृथ्वीराज विचार करीत असतां त्या वाण्यानें पुढील युक्ति सुचविली:—गोदवाडचा राजा हा त्या मेणा लोकांचाच मुख्य असून त्याला रावत असें ह्मणत. त्या रावताजवळ चाकरीस राहण्याची त्याणें त्याला मसलत दिली. त्याप्रमाणें तो त्या रावताकडे जाऊन त्याणें आपलें नांव त्याच्या घोडेस्वारांत दाखल केलें. पुढें अहीरिया नांवाचा त्या लोकांचा सण आला. त्या दिवशीं सैन्यांतील सर्व लोकांस सुटी देऊन त्याच्या त्यांच्या कुटुंबांत जाऊन त्यांणीं तो दिवस घालवावा अशी रीति होती. त्याप्रमाणें सर्व लोकांस सुटी मिळाली व ते लोक जिकडच्या तिकडे आपल्या घरीं गेले. ही संधि बघून पृथ्वीराजानें नांदोलच्या नगरद्वारावर आपले विश्वासु रजपूत ठेवून शहरांतही जिकडे तिकडे रजपुतांचे पाहरे बसविले, आणि त्यांच्या राजास धरून झाडाला गच्च बांधून सर्व शहर आपले ताब्यांत घेतलें. ही बातमी लौकरच मेणा लोकांत पसरून ते घाबरून गेले व आपआपल्या घोड्यांवर बसून डोंगरांत आसरा घेण्याकरितां चालले. तों पृथ्वीराजानें भोंवतालीं सर्वत्र आग लावून दिल्यामुळें, त्यांस गांवातून बाहेर पडण्यास एकच वाट होती तिकडून, ते सुटून जाऊं लागले. पण तेथें पृथ्वीराजाचे लोक त्यांचा संहार करण्यास सज्ज होते, त्यांणीं त्यांस ठार केलें. ह्याप्रमाणें मेणा लोकांचें मुख्य ठिकाण त्याणें आपल्या ताब्यांत घेऊन पुढें ह्याच प्रमाणें हळू हळू बहुत करून सर्व गोदवाड प्रांत आपल्या हस्तगत करून घेंतला. ह्या वेळीं सदा सोळंखी नांवाचा पट्टणचा एक मनुष्य, पट्टण उजाड झाल्यावर तेथून निघून नांदोल येथें येऊन राहिला होता, तोही पृथ्वीराजास मिळाल्यामुळें पृथ्वीराजास चांगला जोर आला होता. व त्याणें पृथ्वीराजास अनेक प्रकारचें साह्य करून त्याचा अभिमान धरिला होता. ह्या प्रांतांतील मूळचे लोक मेणा हेच असून पुढें रजपूत लोकांनीं आपल्या शौर्यानें त्यांस तेथून घालवून आपण त्या प्रांताचे मालक बनले.

ह्याप्रमाणें पृथ्वीराज बापापासून ज्या उमेदीनें बाहेर पडला होता ती उमेद त्याणें बऱ्याच रीतीनें शेवटास नेली. मेणा लोकांची धामधूम आणि बंडावा बहुतेक मोडून

गोदवाड प्रांत त्याचा झाला. तरी तो आपल्या पूर्वीच्या आश्रयदात्या व उपदेशक वाण्यास विसरला नाहीं. त्याणें जो हा पराक्रम करून नांव मिळविलें त्यामुळें त्याचे बापाच्या त्याजवरील क्रोध व अप्रीति कमी होऊन तो विश्वासपात्र झाला असें त्यास (राण्यास) वाटूं लागलें. याच वेळेस, पृथ्वीराजाचा सावत्र भाऊ जयमल्ल मारला गेल्यामुळें राणा रायमल्ल याजजवळ पुत्रांपैकीं कोणीच नव्हतें. ह्मणून त्याणें पृथ्वीराजास आशीर्वादपत्र पाठवून ताबडतोब चितोडास निघून येण्याविषयीं लिहिलें. तेव्हां त्याणेंही आपल्या पित्याचे पत्रास मान देऊन चितोडास जाण्याची तयारी केली. परंतु मागें, कमावलेल्या राज्याची कशी काय व्यवस्था करावी हा विचार होता. तेव्हां त्याणें, ह्या वैभवप्राप्तीस उत्तेजक असा आपला पूर्वीचा आश्रयदाता जो ओझा त्याचे आणि त्याचा दुसरा एक सोळंखी ह्मणून जो वर सांगितलेला पट्टण येथील त्याच्या कृपेतला सरदार होता त्याचे स्वाधीन सर्व कारभार करून तो बापाकडे जाण्यास निघाला.

पृथ्वीराज आपल्या बापाकडे येतो आहे तोंपर्यंत, आपण राण्याचा तिसरा मुलगा जयमल्ल याची हकीकत काय आहे ती बघूं. जयमल्ल हा पहिल्यापासूनच विशेष विषयी होता. त्याची थोदा येथील रावाची तरुण व रूपवती कन्या ताराबाई ह्मणून होती, तिजवर प्रीति बसल्यामुळें त्याणें तिजबद्दल तिचा बाप राव सूरतान (शूरस्थान) याजकडे मागणी केली. राव सूरतान यास, पठाणांनीं थोदा येथून त्याचें राज्य हिसकून घेऊन हांकून लाविलें होतें. 'तें राज्य पुन: परत मिळवून दिलें तर मीं आपली कन्या तुला देईन' असें सूरतान याणें त्याला कळविलें. तें त्याणें कबूल केलें, परंतु विषयी मनुष्यांच्यामध्यें शौर्यापेक्षां व वचनपूर्तीपेक्षां वांछातृप्तीची आवड फार असल्यामुळें जयमल्लाकडून जें पुढें कृत्य घडलें त्यांत आश्चर्यासारखें कांहीं नव्हतें. त्याणें, सासऱ्याचें राज्य त्याला काबीज करून देण्यापूर्वींच ताराबाईचा बलात्कारानें उपभोग घेण्याविषयीं प्रयत्न केला. हें रावास कळल्याबरोबर तो मोठा संतप्त होऊन त्याच वेळीं त्याणें त्याचा शिरच्छेद केला. ह्याप्रमाणें 'तारा ही त्यास अनुकूळ तारा (नक्षत्र) नव्हती.' ह्या वेळीं ह्मटलें ह्मणजे संग हा अज्ञातवासांत कोठें होता याचा राण्यास पत्ता नव्हता व पृथ्वीराजाला राण्यानेंच काढून दिलें होतें; तेव्हां जयमल्ल हाच काय तो राण्याचे पश्चात् मेवाडचा राजा होणार असें सर्व लोक समजत होते. परंतु त्याचा वर लिहिल्याप्रमाणें शेवट झाला. त्यावर, या कृत्याचा सूड उगविण्याविषयीं राणा रायमल्ल यास पुष्कळांनीं भर दिली. परंतु त्याबद्दल त्या भर देणाऱ्यांस त्या पोक्त विचारी राण्यानें जें उत्तर दिलें तें येथें लिहिण्यासारखें आहे. तो ह्मणाला:—'ह्याप्रमाणें असभ्य कृत्य करून, अत्यंत कठीण स्थितींत आहे

अशा वधूचे सभ्य पित्याचा अपमान करणाऱ्या साहसी मनुष्यास, जें शासन पाहिजे तेंच झालें व तें योग्य आहे.' आणि राव सूरतान सोळंखी यानें जयमल्लाला जें शासन केलें तें आपल्यास कबूल आहे असें दाखविण्याकरितां, त्यानें सोळंखी रावास बेदनूर प्रांत बक्षीस दिला!

ही सर्व हकीकत पृथ्वीराज चितोडास आल्यावर त्याला कळली. तेव्हां, भावानें जें वचन पूर्ण केलें नाहीं तें आपण पूर्ण करावें असा त्यानें निश्चय केला. पृथ्वीराजास पहिल्यापासूनच अशा कामांची आवड असल्यामुळें व तशा शौर्याचे कामांत तो वाखाणण्यासारखाच असल्यामुळें त्याणें आपलें बंधुदत्तवचन लागलेंच पूर्ण केलें. तेव्हां अर्थात् ताराबाईनेंही त्या शूर भर्त्यासच माळ घातली. तीही मोठी शूर आणि रणधीर असून ती नेहमीं नवऱ्याबरोबरच धनुष्यबाण घेऊन फिरत असे व त्या फिरण्यांत तिजकडून अनेक शूरपणाचीं व वाखाणण्यासारखीं कामें झालीं. त्यांविषयींचें वर्णन योग्य प्रसंगीं देण्यांत येईल.

ह्याप्रमाणें ह्या तिन्ही भावांचीं आपापसांत भांडणें व कज्जे चालले होते, तरी त्यांचा चुलतभाऊ सुरजमल्ल याचा त्या भविष्यवादिनीच्या कौलावर पूर्ण भरंवसा असून त्या भविष्याप्रमाणें आपल्याला मेवाडच्या राज्यवैभवाचा कांहीं तरी भाग मिळेल अशी त्याला पुरी आशा होती. व प्रसंग सांपडल्यास तो त्याप्रमाणें आपला चितोडच्या गादीवरील वारसा सांगण्यास सिद्ध होताच. त्याच्या बापानें अविचार करून पितृहत्या केली तोही फार दिवस राज्योपभोग न भोगितां व लोकांना अप्रिय होऊन लौकरच मेला, यामुळें आपण या राज्यवैभवास मुकलों असें तो समजून होता. तरी आपला भाग या राज्यांत असतां व भविष्यवादिनीच्याही सांगण्यांत आलें असतां आपण कांहींएक प्रयत्न न करितां स्वस्थ राहावें हें बरें नाहीं, असें मनांत आणून, जयमल्ल मारला गेल्यावर व राण्याच्या दोन्ही मुलांचा पत्ता नाहीं हें जाणून ही संधि हातांत राजसत्ता घेण्याला फार चांगली आहे असें त्यानें मनांत आणिलें. तो लाखा राण्याच्या वंशातला सारंगदेव ह्मणून एक मनुष्य होता त्याचे सहवर्तमान माळव्याचा सुलतान मुजफर याजकडे गेला, व त्याची कुमक घेऊन चितोडावर आला. त्यांणीं साद्री वगैरे कित्येक प्रांत आपले ताब्यांत घेऊन ते चितोडावर स्वारी करण्याची संधि बघत होते. इतक्यांत त्यांजवर रायमल्ल आपल्या हाताखालीं सज्ज असलेले थोडे घोडेस्वार घेऊन चितोडावरून खालीं उतरला. त्यावेळीं त्यांची जी चकमक झाली तींत राण्यास बेवीस जखमा लागून तो व्याकुळ होऊन पडला होता. इतक्यांत पृथ्वीराज एकहजार स्वारांची नवीन भरती घेऊन त्याला येऊन मिळाला आणि ती लढाई त्याणें पुनः चेतविली. नंतर त्याणें लवकरच आपला चुलतभाऊ सुर-

जमल्ल याजवर बापाच्या जखमांचें ओढें काढिलें. त्याणें सुरजमल्लालाही बहुत जखमा करून अगदीं विद्ध केलें. ह्या वेळीं उभय पक्षांकडील बहुत लोक पडले तरी जय कोणाचाच न झाल्यामुळें, त्या दिवशीं संध्याकाळीं लढाई बंद करून दोन्ही पक्षांचे लोक आपआपल्या गोटांत विश्रांतीकरितां परतले.

लढाई बंद असतां उभय पक्षांनीं आपआपलीं वैरें व द्वेष मनांत न आणितां परस्परांशीं प्रेमानें व वात्सल्यानें भाषणें करावयाचीं वगैरे कांहीं विलक्षण चाली पूर्वीच्या क्षत्रियांत असून त्यांचें अनुकरण कांहीं अंशीं रजपुतांमध्येंही असलेलें दृष्टीस पडतें. त्याचा एक मासला प्रस्तुतच्या लढाईतच घडला तो येथें घेतों; ह्मणजे त्यावरून वाचकांस त्या चालीचा नीट रीतीनें बोध होईल. पुढील गोष्ट सुरजमल्लाचे पश्चात् जे सादी येथील गादीवर बसले त्यांच्याजवळ असलेल्या हस्तलिखित बखरींतून घेतली आहे:—या दिवशीं लढाई बंद होऊन सर्व लोक आपआपल्या गोटांत गेल्यावर सुरजमल्लही जखमांच्या वेदना होत असतां शिबिरांत (तंबूत) पलंगावर पडला होता, व न्हाव्यानें त्याच्या जखमा शिवून त्यांस पट्ट्या वगैरे लाविल्या होत्या. तों पृथ्वीराज त्याचे भेटीला आला. तेव्हां त्याला मोठा आनंद होऊन त्या भरांत तो त्याचा सत्कार करण्याकरितां एकदम उभा राहिला. परंतु त्याणें असें करावयाचें नव्हतें. त्याच्या जखमा नुकत्याच शिवल्या व बांधल्या असल्यामुळें त्याणें हालचाल करावयाची नव्हती व तसें त्याजकडून न घडल्यामुळें त्या जखमांचीं तोंडें पुनः उकलून त्यास ज्यास्त वेदना होऊं लागल्या. तथापि त्यांचें पुढें लिहिल्याप्रमाणें बोलणें झालें:—

**पृथ्वीराज**—'बरें, भाऊ, तुझ्या जखमा कशा काय आहेत?'

**सुरजमल्ल**—'प्रियबंधो, तुला बघितल्यापासून त्या अगदीं बऱ्या आहेत.'

**पृथ्वीराज**—'परंतु, भाऊ, मला अजून दिवाणजी भेटले नाहींत. मी पहिल्यानें तुजकडेच तुला भेटण्यासाठीं आलों. मला भूक लागली आहे. तुझ्या येथें कांहीं खायाला आहे काय?'

इतक्यांत सुरजमल्लाच्या जेवण्याची तयारीच होती. आणि ते दोघे समरशूर कट्टे शत्रु बंधुप्रीतीनें त्या शिबिरामध्यें एका थाळींत[1] एकच जेवण जेवले. व पृथ्वीराजानें, त्याजबरोबर त्याच्या पात्रांत बसून कसा जेवूं ही शंका देखील मनांत आणिली नाहीं. शेवटीं भोजन झाल्यावर पानसुपारी खाऊन पृथ्वीराज जातांना ह्मणाला:—

**पृथ्वीराज**—'भाऊ, आपली लढाई आपण आतां उद्यां सकाळीं संपवून टाकूं.'

**सुरजमल्ल**—'बरें आहे बाळ, उद्यां पहांटे ये ह्मणजे ती पुरी करूं.'

---

१. रजपूत लोकांत एकपात्रभोजन हें प्रेमाचें दर्शक आहे असें समजतात.

दुसरे दिवशीं पुनः त्यांची समरामध्यें गांठ पडली. दोन्हीकडचीं सैन्यें जोरानें लढत होतीं. ह्या वेळीं सारंगदेवाला ३५ जखमा झाल्या व पृथ्वीराजाला ७ झाल्या. ह्याप्रमाणें चार घटका मोठें तुंबळ युद्ध झालें आणि बंडवाले (सुरजमल्ल व सारंगदेव) पराभूत होऊन साद्रीस पळून गेले. पृथ्वीराज विजयी होऊन चितोडास परत गेला. पृथ्वीराजाचें ह्मणणें होतें कीं, 'सुरजमल्लाला सुईच्या अग्रावर राहील इतकी मातीसुद्धां मेवाडच्या राज्यांतून, तो हक्कानें मागेल तर, देणार नाहीं.' व सुरज ह्मणे कीं, 'सर्व राज्यावर माझा हक्क असून तूं आमचा ह्मणून मी तुला निजण्यापुर्ती मात्र जागा देईन.' ह्याप्रमाणें दोघांचीं दोन प्रकारचीं ह्मणणीं आणि दोन प्रकारचे वाद होते. शेवटीं सुरज याचा पराभव होऊन तो साद्रीस पळून गेला हें वर लिहिलेंच आहे. परंतु पृथ्वीराजानें कोठें त्याला चैन पडूं दिलें? तो त्याचा पुनः पाठलाग करीत चालला. पुढे त्याणें त्याला गांठिलें व त्याला पकडून तो आपल्या तरवारीनें त्याजवर घाय करून त्यास ठार मारीत होता. त्यावेळीं सुरज त्यास ह्मणाला, 'मला तूं मारिलेंस तर त्यांत कांहीं फिकीर नाहीं. माझे मुलगे रजपुताचे बच्चे आहेत. ते कांहीं करून आपल्याला आश्रय मिळवतील. परंतु ह्याचवेळीं मीं तुला ठार केले तर चितोडच्या राजछत्राचें स्वामित्व कोणाकडे येईल? मग माझ्या तोंडाला मात्र काळोखी लागेल व आजन्म तो कालिमा जाणार नाहीं!'

सुरज याचे तोंडांतून इतके बोलणें ऐकून पृथ्वीराजानें आपली तरवार म्यानांत घातली, आणि सुरजमल्ल यास कडकडून आलिंगन दिलें. नंतर त्यांनीं कुसुंबा करून आपलें वैर मोडिलें. तरी पृथ्वीराजाचा सारंगदेवावर दांत होताच. पुढें एके दिवशीं कालीजन्मोत्सवाकरितां देवीचे देवळांत सर्व मंडळी गेली असून त्यामध्यें सारंगदेवही होता. पृथ्वीराजानें देवीला पाडे (रेडे) व बकरे आपल्या तरवारीनें अर्पण केल्यावर तीच तरवार सारंगदेवावरही फिरवून त्यानें त्यास तेथेंच बळी पाडिलें. व त्याचें मस्तक, तेथें जी यज्ञवेदी प्रदीप्त झाली होती तींत टाकून, त्यानें 'महाकाळापण' ह्मणून ह्मटलें! हे अनर्थकृत्य बघून सुरजमल्ल साद्रीस पळून गेला. आणि त्यानें आपल्या ताब्यांतला सर्व प्रांत ब्राह्मण व भाट यांस दान करून शेवटला मेवाडत्याग केला. पुढें त्यानें एक स्वतंत्र वंश स्थापून प्रतापगड देवळा नांवाचें एक शहर व किल्ला बांधिला व त्याचे आसपासच्या सहस्र ग्रामांचा तो मालक झाला.

१. हिंदुस्थानांतील राजाकडून ह्या प्रतिष्ठित भिक्षुकास जो लाट सांपडला गेला तसा कोठेंही सांपडणें नाही. वरील प्रांत जो सुरज यानें दान केला त्याचें क्षेत्रफळ ५२००० बिघे असून ही जमीन फारच सुपीक आणि उत्पन्नाची असल्यामुळें ती अशी वांटण्या देण्यावालींच पार झाली व हळूहळू मेवाड जें भिकार झालें त्याचें कारण तें अनुदिन भिकाऱ्यांचेच हातीं गेलें त्यामुळें त्याचा वैभवरक्षक कोणी राहिला नाही!

ह्या प्रांतांत सुरज याचे वंशज अजून असून ते इंग्रज सरकारच्या रक्षणाखालीं त्या प्रांताचा भोगवटा उपभोगीत आहेत. ह्याप्रमाणें प्रतापगड देवळा या प्रांताची हकीकत आहे.

पुढें पृथ्वीराज हा विषप्रयोगानें मेला. हें विष त्याचा मेहुणा अबू येथील ठाकूर यानें दिलें, कारण पृथ्वीराज यानें त्यास पूर्वी आपल्या बहिणीस त्यानें वाईट रीतीनें वागविल्याबद्दल शिक्षा केली होती. पृथ्वीराज मेल्यावर पुढें थोडेच दिवसांनीं त्याचा बाप रायमल्ल हाही पुत्रशोकानें थकून मेला. त्यानें आपल्या पूर्वजांसारखाच मोठा लौकिक आणि सन्मान मिळविला, व तशींच त्यानें दुःखेंही बहुत पाहिलीं.

---

## भाग सातवा.

### संगराणा व विक्रमाजित.

चितोडास संगराण्याला राज्याभिषेक.—मुसलमानी राजसत्तेची स्थिति.—संगाची कृतज्ञबुद्धि.—त्याची कारकीर्द.—हिंदुस्थानावरील परचक्र व हिंदुराजांची स्थिति.—मुसलमानांच्या हिंदुराजांशीं लढाया.—हिंदुलोकांचा टिकाऊपणा.—नवीन मुसलमानशत्रु.—बाबर याची पूर्वस्थिति.—त्याचें गुणवर्णन.—बाबराचा लेख.—बाबराचें पुढें कूच.—बाबराची व संगराण्याची चकमक.—संगाकडे फितूर व त्यामुळें पराजय.—मुसलमानांस जय.—संगराण्याचा शेवट.—रजपूतांचें अनेकपत्नीत्व व त्यामुळें संकटे व धोके.—संगराण्याचें स्वरूपगुणादि वर्णन.—रत्नसिंग गादीवर बसतो.—त्याचा अंत.—विक्रमाजित राज्याधिकारी होतो.—त्याचें स्वभावगुणवर्णन.—गुजराथच्या सुलतान बहादुराची चितोडावर स्वारी.—चितोडास रजपूतराजांची मदत.—बहादूर सुलतान याच्या फौजेची तयारी.—रजपुतांस अपयश.—जोहाराची तयारी आणि स्त्रीयज्ञाची सिद्धता.—बहादुराच्या हातांत चितोड जातें.—चितोडास हुमायुनाचें साह्य.—मोंगलांचें चितोडच्या राणीशीं 'राखीबंदभाई'चें नातें.—विक्रमाजिताचा दुष्ट स्वभाव व मौर्ख्य.—विक्रमाजिताविरुद्ध कट व त्याचा वध.

पूर्वभागांत पृथ्वीराज विषप्रयोगानें मेल्यावर लौकरच त्याचा बाप व चितोडचा राजा रायमल्ल हाही थकून मेला, हें सांगितलें. रायमल्लाच्या तीन पुत्रांतील दोन पुत्रांचा शेवट त्याच्याच देखतां व तोही अपमृत्यूनें झाला, हें त्याला क्षीण होण्यास विशेष कारण झालें असेल यांत संशय नाहीं. असो; तो मृत्यु पावल्यावर अज्ञातवासांत असलेला संग—ज्याचें नांव संग्रामसिंह असें होतें—तो येऊन वि० सं० १५६५ ह्मणजे इ० स० १५०९ मध्यें चितोडच्या गादीवर बसला. संगाच्या कारकीर्दींत मेवाडची फार भरभराटी आणि कीर्ति वाढली असें ह्मणतात. कारण, त्यापुढें मेवाडास उतरती कळाच आली.

दिल्ली येथील क्षत्रियांचे सिंहासनावर पांडववंशीय तुवरापासून चव्हाणापर्यंत राजे

होऊन गेले. त्यांचे मागून गिजनी, गोरी, खिलजी व लोदी हे अनुक्रमें मुसलमान बादशाह झाले. पुढें त्यांच्या राज्याचे तुकडे तुकडे होऊन दिल्लीपासून काशीपर्यं-तच्या प्रदेशांत एककालीं निरनिराळे चार मुसलमानी सुलतान राज्य करूं लागले; व ते दिल्ली, बियाना, काल्पी व जोधपूर येथील सुभेदार होते. त्यांणीं आपआपलीं निरनिराळींच राज्यें चालविण्याचा क्रम सुरू केला. यामुळें दिल्लीचें भय मेवाडच्या राण्यास फारसें राहिलें नव्हतें. संगराण्याजवळ ऐंशीहजार स्वार, सात मोठे राजे, नऊ राव, एकशेंचार टाकूर, रावळ व रावत या नांवाचे सरदार व पांचशें हत्ती इतकें सैन्य होतें. त्याचप्रमाणें जोधपूर (मारवाड) व जयपूर (अंबेर) येथील राजे त्यास अनुकूल असून ग्वाल्हेर, अजमीर, शिक्री, रायसेन, काल्पी, चंदेरी, बुंदी, गाग्रोन, अबू व रामपुरा येथील सर्व राव व राजे त्यास खंडणी देऊन त्याचे मांडलिक असत व ते त्यास फार मानीत. याप्रमाणें संगराणा त्याकाळीं चांगला बलिष्ठ होता.

संगराणा अज्ञातवासांत असतां त्याला ज्यांणीं ज्यांणीं आश्रय दिला त्यांस तो विसरला नाहीं. त्याचा मुख्यत्वें परामर्ष घेणारा श्रीनगरचा ठाकूर करमचंद (कर्मचंद्र) याचा उपकार स्मरून त्यानें त्याला अजमीर प्रांत दिला व त्याचा मुलगा जगमल्ल यानें त्याला चंदेरीच्या स्वारीत मदत केल्यामुळें त्यास 'राव' अशी पदवी दिली.

संगराणा राज्यारूढ झाल्यावर थोडेच दिवसांनीं त्याणें राज्यांतील तंटेबखेडे आणि कुटुंबांतील कलह व धुसफुस मोडून चांगली शांतता केली. त्यानें दिल्ली व माळवा येथील फौजांबरोबर एकंदर १८ लढाया दिल्या. त्यांमध्यें बाकरोल व घाटोली येथील लढायांमध्यें तर दिल्लीचा बादशाह इब्राहिम लोदी हा स्वतः असून त्या वेळीं त्याचे लोक फार मेले व त्याचा पराभव होऊन त्याचा एक मुलगा कैद झाला व त्याला संगानें चितोडास नेले. ह्या वेळीं मेवाडच्या राज्याची हद्द—उत्तरेस बियाना नदी, दक्षिणेस व पूर्वेस माळवा आणि पश्चिमेस मेवाडचे डोंगर व टेंकड्या—याप्रमाणें होती. ही हद्द ह्मणजे बरीच विस्तीर्ण असून हें सर्व ऐश्वर्य संगराण्याकडे आल्यामुळें त्यास 'चक्रवर्ती' ह्मणण्याची वेळ आली होती. पूर्वी जशी आर्यावर्ताची इंद्रप्रस्थ (दिल्ली) ही राजधानी होती त्याप्रमाणें हल्लीं सकलैश्वर्यपूरित चितोडनगर हेंच हिंदुस्थानची राजधानी होण्याच्या आकारांत आलें होतें. परंतु इतक्यांत, अचेतन पडलेल्या मुसलमानी बादशाहीस जागृत करण्याकरितांच जणूं काय, तार्तरी देशाहून बाबर ह्मणून एक शूर मुसलमान पुरुष, खालीं उत्तर-हिंदुस्थानांत येऊन त्याणें मेवाडच्या वैभववृद्धीस अटकाव केला.

प्राचीनकाळापासून हिंदुस्थानदेशाचें हेंच प्रारब्ध असलेलें दिसतें कीं, मध्यएशियाखंडांतून दांडगे व बलिष्ठ लोकांनीं येऊन निरुपद्रवी व शांत प्रकृतीच्या सुखवस्तु हिंदुस्थानास लुटावें. हा क्रम पूर्वयुगांपासून चालत आलेला आहे. तशांत, या देशांत अनेक छोटीं छोटीं राज्यें असून त्या परस्परांचें ऐकमत्य नसल्यामुळें व लोकांमध्येंही अनेक जाती, कुळें, शाखा व धर्म यांचे अनेक भेद असल्यामुळें त्या परस्परांचीं आपापसांतील वैरें, द्वेष, कलह व तंटे नेहमीं चालू राहून परशत्रूंपासून संरक्षण होणें मुष्कील होई. ही स्थिति दोनहजार वर्षांपूर्वी यवनांचा अधिपति शिकंदर बादशाह जेव्हां या देशावर आला तेव्हां त्याच्याही दृष्टीस पडून त्याबद्दल त्यानें वर्णन केलें आहे. तो पंजाबापर्यंत आला होता. तितक्या प्रदेशांत त्याला शेंकडों राजे व शेंकडों ठाकूर आढळून, त्या प्रत्येकाचा विचार बघतां तो पृथक् पृथक् पडून, कोणाचा कोणावर इतबार नाहीं, विश्वास नाहीं व भरंवसा नाहीं, असें त्याच्या दृष्टीस पडलें. यामुळें परशत्रूंस या देशांत चांगली वांव सांपडे. त्या काळीं तर मुसलमान सरदारांस हिंदुस्थान ही एक कामधेनु किंवा कल्पवृक्षच झाला होता. ज्या मुसलमान सरदारांस स्वदेशांत ठिकाण नसे त्यांनीं कांहीं फौज जमा करून इच्छितसुख भोगण्यास व रंकाचा राव बनण्यास हिंदुस्थानांत यावें. याप्रमाणें इसवी सनाच्या सातवे शतकापासून चाललें होतें, व या परशत्रूंचा प्रवाह सारखा हिंदुस्थानावर लोटत येत होता. एकाला ऐश्वर्य प्राप्त होऊन तो गब्बर झाला ह्मणजे दुसऱ्याला लोभ सुटून, त्याणें त्याजवर येऊन त्याला काढून आपण बादशाह किंवा सुलतान व्हावें. त्यानंतर तिसऱ्यानें, चवथ्यानें, याप्रमाणें एकामागून एक असे अनुक्रमें बोखारा, इराण, काबूल, गिजनी, इत्यादि अनेक ठिकाणांहून अनेक मुसलमान दंगेखोर येऊन त्यांनीं हिंदुस्थानाचा पिच्छा धरिला होता. आणि अशा समयीं बिचाऱ्या हिंदुलोकांस

---

१. यवनलोक ह्मणजे ग्रीक लोक. यास मुसलमान 'युनानी' ह्मणतात व त्यांच्या देशास 'यूनान' ह्मणतात. ग्रीकलोकाना यवन ह्मणण्याचा परिपाठ हिंदुलोकांनीं व त्यांच्या ग्रंथकारांनीं पाडिला आहे. यवनांचें राज्य मुसलमानी धर्म प्रसिद्ध होण्यापूर्वीच बुडून त्यावर रूमचें राज्य उभें राहिलें. पुढें यवनदेश (ग्रीस) तुर्कस्थानच्या सुलतानाकडे बहुत वर्षें होता. परंतु कांहीं दिवसांनीं तें राज्य स्वतंत्र झालें. ग्रीस देशांत हल्लीं बहुतेक खिश्चियन लोक असून थोडे मुसलमान व यहुदीही आहेत. यवनांची बादशाही व रूमची बादशाही आटोपल्यावर मुसलमानी धर्म प्रकट झाला. मुसलमान हें कांहीं एका देशाचें नांव नसून धर्माचें नांव आहे. व यामुळें मुसलमान या नांवाखालीं, जेवढे मुसलमानधर्मानुयायी असतील तेवढे यावयाचे हें सांगणें नकोच. ह्याप्रमाणें अर्बस्थान, इराण, तुर्कस्थान, मिसर किंवा काबूल या देशांतील सर्व लोकांस मुसलमान ह्मणावयाचें. यवनांचें राज्य असतां त्यांचा बादशाह शिकंदर (अलेक्झांडर) हा वर लिहिल्याप्रमाणे २२०० वर्षांपूर्वी इकडे आला होता.

तर त्यांचा धर्म, जात, देश, स्थिति वगैरे कांहीं एक माहित नसल्यामुळें त्यांजपुढें त्यांच्या लढाऊ क्षत्रियांचा व रजपुतांचा पराक्रम आणि शौर्य हीं कांहींएक न चालतां त्यांनीं त्यांचीं ठिकठिकाणून पाळेंमुळें खणून काढून एतद्देशीय राज्यांची धूळधाण करून टाकिली. शिकंदरापासूनच ह्या परशत्रूंचा पायरव हिंदुभूमीस लागला असून आज हजारों वर्षे परदेशीय लोक हा देश धुऊन नेत आहेत. शिकंदरापूर्वी इराणचा बादशाह दारा (डरायस्) यानें हिंदुस्थानचा कांहीं भाग जिंकिला होता व त्याणें असें लिहून ठेविलें आहे कीं, 'माझ्या एकंदर जिंकिलेल्या प्रदेशांत हिंदुस्थानासारखा श्रीमान्, संपन्न व सर्व गुणांनीं मातबर असा दुसरा कोणताही देश सांपडला नाहीं.' ह्याप्रमाणें ज्यानें उठावें त्यानें हिंदुस्थानावर लाट मारावा व सुखी व्हावें. जणूं काय ईश्वरानें सर्व भिकारी राष्ट्रांस आणि दरिद्री लोकांस संपन्न करण्याकरितां हिंदुस्थान ही एक संपत्तीची खाणच करून ठेविली होती व या खाणींतून ज्याला हवी असेल त्यानें व ज्याजमध्यें शक्ति असेल त्यानें ती संपत्ति बेलाशक हक्कानें पावडीं लावून खणून न्यावी! असा क्रम आजपर्यंत एकसारखा चाललेला आहे व असाच पुढें चालावयाचा असें धोरण दिसतें![1]

शहाबुद्दीन गोरीपासून बाबरापर्यंत तीनशें वर्षांत पांच वेळ हिंदुस्थानावर मुसलमानांचे जंगी हल्ले आले व त्या प्रत्येक वेळीं पहिला बादशाह जाऊन त्याचे जागीं नव्यानें बसावें अशी रेज चालली होती. संगराण्याचें जें बाबराबरोबर युद्ध झालें, हा मुसलमानांशीं हिंदूंचा शेवटचाच संग्राम झाला असें ह्मटलें असतां हरकत नाहीं. कारण, संगाचे मागून परशत्रूंशीं लढण्यास व त्यांजपासून या देशाचें रक्षण करण्यास कोणालाच सामर्थ्य उरलें नाहीं.

वर लिहिल्याप्रमाणें यवन, मोंगल व तातार वगैरेंच्या धिंडका येऊन गेल्यावर इंग्रजांची स्वारी या देशावर आली. ते लोक संख्येनें जरी अल्प होते तरी त्यांची अक्कल फार मोठी असल्यामुळें त्यांणीं लौकरच सर्व देश जिंकून ते हल्लीं निर्वेध

---

१. वर हिंदुस्थानाबाहेरील लोक हिंदुस्थानांत येऊन लूटफाट व दंगेधोपे, हाणामाऱ्या करून संपत्तिमान् व सत्तावान् होत ह्मणून लिहिलें. परंतु हिंदुस्थानांतही ही लुटालुटी आणि खेंचाखेंची नव्हती असें नाहीं. दक्षिणेकडील उत्तरेकडे व उत्तरेकडील दक्षिणेकडे असे वरखालीं एतद्देशीय लोक संपत्ति व सत्ता मिळविण्यासाठीं जात येत असत. दक्षिणेकडील मराठ्यांसही कांहीं दिवस हिंदुस्थान ही एक कामधेनुच मिळाली होती. होळकर, राजेबहादर, अलीबहादर व शिंदे वगैरे दक्षिणच्या सरदारमंडळीची हिंदुस्थानावर एकसारखी माळच लागली होती व त्यांनीं त्या वेळीं संपत्तीही पुष्कळ मिळविली. ह्याप्रमाणें, ज्यास शेंपन्नास स्वार मिळतील त्यानें आपला हिंदुस्थानाकडे रोंख धरावा कीं काम फत्ते झालेंच; असा काळ त्यावेळीं आला होता. डाव पडला ह्मणजे असा पडतो: रावाचा रंक आणि रंकाचा राव बनण्यास उशीर लागत नाहीं.

रीतीनें राज्य करीत आहेत. हा साधारण चमत्कार नव्हे. शिवाय, अन्य देशांतही असे परदेशीयांकडून मोठमोठे दंगे, हल्ले व स्वाऱ्या झाल्या व त्यांचीं पूर्वरूपें अगदीं बदलून गेलीं: त्यांच्या जाती बदलल्या, कुळांत मिश्रीकरण झालें, आणि त्यांचीं मूळचीं नांवेंही बदलून धर्म आचार वगैरे तर सर्व बदलून गेलीं. परंतु या देशाकडे बघितलें तर हा विलक्षण चमत्कार दृष्टीस पडतो कीं, या देशावर कसेही राजे असोत, कशाही राज्यक्रांति होवोत, कशींही परचक्रें येवोत,व कसेही प्रलय होवोत, हिंदुलोक आपली स्थिति, रीति, धर्म व आचारविचार हीं ह्मणून कधींही सोडावयाचे नाहींत. तीं अगदीं यथापूर्व कायम ठेवण्याचा त्यांचा मोठा अभिमान आहे. तीनहजार वर्षांपासून तरी असेंच आढळेल कीं, हिंदुस्थानांतील क्षात्रवृत्तीचे जे क्षत्रिय व रजपूत लोक आहेत त्यांच्या अभिमानपराक्रमांत आणि आचारविचारांत ह्मणून बिलकुल पालट झाला नाहीं व तसा पालट करण्याविषयीं त्यांनीं कधींही इच्छा धरिली नाहीं. याविषयींचीं उदाहरणें पाहणें असल्यास दूर जाणें नको. या राजस्थानांतच महापराक्रमी आणि शूर असे पूर्वी बहुत लोक होऊन गेले व पुढेंही होतील; परंतु ते वर लिहिल्याप्रमाणेंच सर्वदा अभिमानी आणि यथापूर्व आचारविचारांनाच चिकटून असलेले आढळतील. येवढ्याकरितां, या हिंदुस्थानांत जे कोणी परकीय राजे राज्य करितील त्यांणीं या क्षात्रधर्मी शूर जातीचें योग्य रीतीनें रक्षण करून, ते प्रसंगीं आपले उपयोगीं पडतील असें करावें.

हिंदूंच्या पुराणादि ग्रंथांत अशीं भाकितें लिहिलीं आहेत कीं, 'हिंदुस्थानांत म्लेंच्छ, तुर्क व यवन आदिकरून परदेशीय लोकांचें राज्य होईल.' तीं भाकितें सत्य होण्याचा समय ह्या वेळीं पूर्णपणें आलेला दिसतो. वर लिहिल्याप्रमाणें ह्या वेळीं संगराण्याला बलाढ्य शत्रु बाबर ह्मणून उत्पन्न झाला. हा, तुर्कस्थानांतील फरघाणा ह्मणून एक प्रांत आहे तेथील राजा होता. तुर्कस्थानास हिंदुलोकांच्या ग्रंथांत 'शाकद्वीप' असें ह्मटलें आहे. पूर्वी तैमूर व जंगिसखान हे जसे हिंदुस्थानावर आले होते तसाच बाबरही दोनहजार स्वार बरोबर घेऊन समरकंद सोडून इकडे विजय आणि सत्तासंपत्ति मिळविण्याकरितां आला.

बाबर हा संगराण्यासारखाच अनेक दुःखसंकटें व टक्केटोणपे भोगून अनुभवलेला मनुष्य होता. हा इ० स० १४९४ सालीं आपल्या राज्यावर बसला. त्या वेळीं त्याचें वय केवळ बारा वर्षांचें होतें. तो सोळा वर्षांचा होतो आहे तोंच त्याच्या पराक्रमास आरंभ झाला. त्यानें दोनवेळां समरकंद शहर काबीज केलें. परंतु तें लौकरच त्याजकडून गेलें. त्याजवर असे असे चमत्कारिक प्रसंग आले होते कीं, त्यांमुळें तो खूबच हुशार, धीराचा व विचारवान् असा बनला होता. एकवेळेला तो आपल्या

विस्तृत राज्यामध्यें राजेश्वर ह्मणून सन्मान पावे व एकवेळ त्याला एकटेंच वेषांतरानें आणि लपून छपून अनेक संकटें व यातायाती सोशीत पळत फिरावें लागे. ह्याप्रमाणें त्याला शेंकडों वेळ जयपराजय आणि सुखापत्ति अनुभवावीं लागलीं. शेवटीं त्याजवर मोठेंच परचक्र येऊन तो समरकंद येथून पळाला; तो हिंदुकुशपर्वतावरून खालीं उतरून दरकूच दरमजल करीत करीत इ० स० १५१९ त तो सिंधुनदीचे अलीकडे आला. ह्या वेळीं, ह्मणजे समरकंद येथून पळाला तेव्हां, तो केवळ एकटाच असून सात वर्षेपर्यंत तो काबूल व पंजाब येथें कांहीं जमवाजमव करण्याकरितां राहिला होता. तेथें त्यानें बरेच लोक जमवून नंतर दिल्लीचा इब्राहिम बादशाह याजवर स्वारी केली. या स्वारीमध्यें त्याच्या तरवारीला यश मिळून त्याचें दैव त्यास अनुकूळ झालें. ह्या स्वारीमध्यें इब्राहिम मारला जाऊन दिल्लीचें तख्त, फार दूरचा फरघाणा येथील राजा जो हा बाबर त्याचे हातांत आलें. बरेच दिवसपर्यंत मोठ्या दीन अवस्थेंत त्यानें काळ काढिला होता ह्मणून या जयानें अगदीं गर्विष्ठ न होतां नम्रपणें तो ह्मणाला, 'हा विजय ईश्वराचा आहे, माझा नाहीं. देवा, तूं असाच विजयी ऐस !' हा जय मिळाल्यानंतर एक वर्षानेंच तो चितोडचा बलाढ्य रजपूत राजा संगराणा याजवर चालून येण्याच्या तयारीस लागला.

बाबर हा स्वत: मोठा गुणी असून त्याला कविता करण्याचा व इतिहास लिहिण्याचा फार नाद असे. त्यानें आपल्या सर्व जयापजयांचें टिप्पण लिहून ठेविलें असून तो सत्यप्रिय होता. इतर मुसलमान वीरांसारखा तो नेहमीं धर्माभिमानी नसल्यामुळें त्याजकडून धर्मसंबंधानें कोणावर सर्वकाळ फारसे जुलूम झाले नाहींत व त्या योगानें तो पुढें पुढें सर्वप्रिय होत गेला. त्याचा पराक्रम किती होता याचें वेगळें स्पष्टीकरण नकोच आहे. ज्या अर्थी तो आपल्या राज्यांतून पदच्युत होऊन इतक्या लांब धीर धरून आला व त्याणें इकडे सर्व जमवाजमव व मिळवामिळव करून वर लिहिल्याप्रमाणें दिल्लीचें राज्य संपादिलें; इतकेंच नाहीं, तर परम शूर अशा वाखाणलेल्या रजपूत राजांशीं युद्ध करण्याचीही त्यानें सिद्धता केली; यावरूनच तो कसा शौर्यधैर्यांचा मनुष्य होता हें समजतें.

बाबर हा स्वारीची सर्व तयारी करून आग्र्याहून शिक्रीच्या मार्गानें राणा संग याजवर निघाला. तेव्हां संग हा राजस्थानचे सर्व राजे मदतीला घेऊन तयार होता. वि० सं० १५८४ च्या कार्तिक मासीं (इ० स० १५२८ त) संगानें बियाना नदी उतरून, बाबराचे पंधराशें मुसलमान पुढें येत होते त्यांची कत्तल उडविली. ह्याप्रमाणें 'प्रथमग्रासे मक्षिकापात:' झाल्यावर बाबराला पुढची आशा नाहींशी झाली. त्याचें सैन्य ह्मणजे कांहीं फारां दिवसांचें त्याजजवळ राहिलेलें नस-

त्यामुळें त्यांजकडून विश्वासानें व नेटानें काम होईल किंवा नाहीं याबद्दल त्याला संशय उत्पन्न झाला व यामुळें आपल्याला खास जय मिळेल अशी खात्री वाटल्याशिवाय पुढें जावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय करून, तो आपल्या सैन्याभोंवतीं खंदक खणून सुरक्षित स्थळीं कांहीं दिवस राहिला. त्याणें ह्याप्रमाणें सुरक्षितता केली खरी, तरी तो मधून मधून एकेक टोळी रजपुतांवर पाठवी. परंतु त्यांचा सर्वांशीं मोड होई, यामुळें त्याची अजून जयाची खात्री होईना. तथापि, यामुळें तो निराश झणून झाला नाहीं. त्यानें आजपर्यंत असे प्रसंग पुष्कळ वेळां अनुभविले असल्यामुळें तो ह्या अपयशाला भ्याला नाहीं. तो अधिक अधिक बंदोबस्त करून, पुढील यशप्राप्तीला जितकी सावधगिरी ठेविली पाहिजे असें त्यास वाटलें, तितकी ठेवण्यास त्याणें हयगय केली नाहीं. परंतु जावत्कालपर्यंत दैव अनुकूल नाहीं तावत्कालपर्यंत मनुष्याचे नुस्ते प्रयत्न आणि सावधगिऱ्या काय करणार ? बाबराचे ग्रह प्रस्तुतप्रसंगीं अनुकूळ नाहींत, असें त्याच्या ज्योतिष्यानें सांगितलें होतें. जोशी झणाला, 'हल्लीं पश्चिमेकडे मंगळ असल्यामुळें त्याचे पुढील दिशेकडून झणजे पूर्वेकडून जो राजा येईल त्याचा पराभव होईल.' ह्याप्रमाणें त्याला आपली ग्रहदशा समजल्यामुळें तो कांहींएक हालचाल न करितां खंदकाच्या आंतच स्वस्थ राहिला. त्याला असें वाटूं लागलें कीं, आपल्याकडून कांहीं दुराचरणें होत असतील त्यांमुळें आपल्याला ही ग्रहदशा आडवी येते. तेव्हां, आपल्याकडून कोणतीं दुराचरणें घडतात झणून तो शोधूं लागला. त्या वेळीं त्याला असें आढळून आलें कीं, 'आपण दारू पितो हें आपल्या शास्त्राप्रमाणें (मुसलमानी धर्मशास्त्राप्रमाणें) मोठें पातक आहे; आणि या पातकामुळेंच अपेशाचा भोगवटा मला भोगावा लागत आहे.' असें झणून त्यानें पुनः मद्याला स्पर्श न करण्याचा निश्चय केला. या गोष्टीचा जो त्यानें विचार ठरविला त्याविषयीं खुद्द त्याणें आपल्या रोजनिशींत काय लिहून ठेविलें आहे तें त्याच्याच शब्दांनीं येथें उतरून घेतल्यास वाचकांस अधिक प्रिय होईल झणून आह्मी त्याचा लेख भावार्थानें याखालीं देतों. तो लिहितोः—"मी माहे जमादी ता० २३ रोज सोमवार या दिवशीं, घोड्यावर बसून आपल्या लष्करी अधिकाऱ्यांची पाहणी करण्यास निघालों असतां एकाएकीं माझ्या मनांत अनेक विचार येऊं लागले. कृतकर्माचा विचार करून झालेल्या चुकांबद्दल पश्चात्तापपूर्वक सुधारणूक करण्याचा माझा संप्रदाय असे. त्याप्रमाणें मला हल्लीं अपेश कां येतें याबद्दल मी आपल्याशीं विचार करूं लागलों. मी आपल्याला झटलें, 'हे जीवा, तूं ह्या चालू क्रमाप्रमाणें या पातकी व्यवहारामध्येंच किती दिवस सुख व चैन भोगणार आहेस ? बाबारे, तुला कांहीं तरी पश्चात्ताप होऊं दे. तूं या पातकामुळें किती अपवित्र आहेस ! वारंवार होणाऱ्या निराशेमध्येंच तूं

कसलें सुख मानून बसला आहेस? तूं मनोविकारांचा किती दिवस गुलाम होऊन राहणार आहेस? तूं आपलें आयुष्य किती व्यर्थ घालविलेंस? * * * तूं पवित्र धर्मकृत्यांत आपलें आयुष्य घालवावेंस तसें न करितां निषिद्ध व तिरस्कृत अशा चैनींत, मौजांत आणि कर्मणुकींतच आपल्याला बुडवून सुख मानतोस, त्यांतून आपल्याला काढून सर्व पातकांपासून मुक्त हो.' ह्याप्रमाणें जीवाला बोध करून मीं असा निश्चय केला कीं, आपण मद्यपान करितों हेंच मोठें पातक करितों, व त्याप्रमाणें इतःपर मद्यपान ह्मणून करावयाचें नाहीं. मीं माझीं सोन्यारुप्याचीं आणि दुसरीं तशींच सर्व मद्य पिण्याचीं पात्रें आणून फोडविलीं आणि 'पुनः मद्यपान करावयाचें नाहीं' अशी मीं शपथ घेतली. याप्रमाणें मीं माझें मन पवित्र केलें. मद्यपानपात्रांचे जे तुकडे केले ते मीं सर्व फकीर आणि गरीब लोकांस वांटून देवविले. मला जो वर लिहिल्याप्रमाणें पश्चात्ताप झाला त्याचप्रमाणें आसास ह्मणून एक मनुष्य होता त्यालाही होऊन त्याणेंही माझ्याप्रमाणेंच दाढी वगैरे वाढविण्याचा निश्चय केला. पुढें त्या दिवशीं रात्रीं व दुसरे दिवशीं मिळून सुमारें तीनशें अमीर, राज्यकारभारांतले मुख्य अधिकारी, शिपाई व इतर सरदार यांनीं वर लिहिलेल्या आमच्या नियमाप्रमाणें वागण्याच्या शपथा घेतल्या. आमच्या बरोबर जें मद्य होतें तें आह्मीं जमिनीवर ओतिलें, आणि जी दारू बाबा दोस्त यानें आणिली होती तींत मीठ मिसळून पिण्याला निरुपयोगी करून टाकण्याविषयीं मीं हुकूम केला. जेथें दारू ओतविली तेथें एक दगडी स्थान बांधवून त्याजवळच एक भिक्षागृह बांधण्याचा मीं ठराव केला. मी पुढें जेव्हां सन (फसली) ९३५ च्या मोहरम महिन्यांत धवलपुराहून शिक्रीस जातांना मध्यें ग्वाल्हेरीस उतरलों, तेव्हां वरील मद्यपरित्यागस्थान आणि भिक्षागृह हीं बांधून तयार झालेलीं बघितलीं. शिवाय, मीं असा नवस केला होता कीं, जर मला संगराण्यावर जय मिळाला तर शिक्क्याचा जो कर मी वसूल करीत असें तो मुसलमानांस माफ करीन. ह्या प्रकारचे माझ्या पातकासंबंधीं पश्चात्तापाचे जे नवस व निश्चय मीं केले त्यांचें, महंमद सारबान व शेख झिन या दोघां फकीरांनीं मला वारंवार स्मरण द्यावें. तेव्हां मीं त्यांस सांगितलें कीं, 'तुह्मी मला वारंवार स्मरण देतां हें फार आहे व त्याप्रमाणें मी माझ्या सर्व राष्ट्रांत जितके ह्मणून मुसलमान आहेत तितक्यांस शिक्क्याच्या कराची अगदीं माफी जाहीर करितों.' आणि त्याप्रमाणें मीं आपल्या चिटणिसांस लागलेंच बोलावून आणून त्यांजकडून माझ्या ताब्यांतील सर्व मुलखांत वरील दोन्ही गोष्टींबद्दलचीं जाहीरपत्रकें पाठविलीं."

येणेंप्रमाणें बाबरानें व्यवस्था केल्यावर त्यानें आपल्या सर्व लोकांस एकत्र बोलाविलें आणि त्या सर्वांस उत्तेजनपर असें भाषण केलें. त्याला अद्यापि आपल्यास

यश मिळेल अशी खात्री नव्हती; तरी, त्यानें आपल्या लोकांकडून मारूं किंवा मरूं अशी कुराणावर शपथ घेववली. ह्या वेळीं बाबरानें जें भाषण केलें तें फारच उत्कृष्ट व प्रोत्साहक होतें. तें त्यानें आपल्या चरित्रांत सर्व लिहून ठेविलें आहे. अस्तु. ह्याप्रमाणें लोकांनीं शपथा घेतल्यावर व त्यांचा एक निश्चय पाहून, एक महिनापर्यंत जो त्यानें एका ठिकाणीं तळ दिला होता तो उठवून त्यानें पुढें कूच केलें. ते सर्वजण तळापासून पुढें दोन मैल गेले तों रजपूत त्यांच्या बंदुकीच्या टप्प्यांत होते. संगराणा शूर खरा व त्याला त्याच्या जातभाईचें साह्य खरें; परंतु तो या वेळीं फारच गैरसावध राहिला. बाबराचा एकेक दिवस लांबत चालला तसा तो आतां पुढें येत नाहीं असें वाटून व त्याचा काय उद्देश हें समजून घेण्याचें सोडून तो स्वस्थ राहिला. पहिल्यापासून संगामध्यें असावी तशी तरतरी व चपलता नव्हती हें बाबरास माहित होतें.[1] व त्याप्रमाणेंच आपला हल्लींचा स्तब्धपणा बघून तो असावध असेल असें बाबरालाही वाटलें होतें. इकडे तंटा मिटविण्याकरितां संगानें रायसीनचा तुवर जातीचा राजा सिलौदी या नांवाचा मनुष्य बाबराकडे मध्यस्थ पाठवून उभयतांच्या राज्यांची सरहद्द ठरविण्याचें बोलणें चालविलें होतें. त्यांत 'चितोडच्या राज्याची जी हद्द आहे तीच असली पाहिजे व उभयतांचा स्नेह असावा म्हणून बाबराला आपल्याकडून कांहीं पोंचत जाईल' असें संगानें सांगून पाठविलें. परंतु मध्यस्थानें ज्या प्रकारानें तें काम केलें पाहिजे होतें त्याप्रमाणें त्याजकडून न घडतां दोघेही हातघाईला येऊन पोंचले.

ता० १६ मार्च इ० स० १५२८ या दिवशीं प्रथमतः मुसलमानांवर रजपुतांनीं उजवीकडून हल्ला केला. तरी त्यांत त्यांचाच फार नाश झाला. मुसलमानांच्या बंदुकांपुढें आणि तोफांपुढें रजपुतांच्यानें जाववत नसे. त्याचप्रमाणें रजपुतांचे मोठमोठे नामांकित सरदारही ठार झाल्यामुळें रजपुतांचें फारच नुकसान झालें. तरी अद्यापि जय कोणत्या पक्षाला आहे हें कोणासही कळेना. इतक्यांत वर सांगितलेला रायसीनचा तुवर हा फितूर होऊन संगाकडून निघाला व बाबराला जाऊन मिळाला. प्रथमपासूनच या तुवराची वागणूक अशी विश्वासघाताची होती व शेवटीं त्यानें याप्रमाणें डाव साधिला, आणि यामुळें संगराण्याकडे जो फत्ते येण्याचा रंग दिसत होता तो बदलून त्याला उलट माघार घ्यावी लागली. या लढाईत संगराण्याला

---

१. बाबर हा आपले आत्मचरित्रांत एके ठिकाणीं लिहितो कीं, 'मी जेव्हां काबुलांत होतों तेव्हां संगराण्यानें आपला वकील मजकडे पाठविला होता व तेव्हां आमचा परस्पर असा ठराव झाला होता कीं, मी दिल्लीवर चाल करून गेलों तर संगानें आग्र्यावर यावें. परंतु पुढें मीं दिल्ली घेऊन आग्राही घेतली तरी संग ठिकाणचा हालला नाहीं.'

पुष्कळ जखमा झाल्या व त्याचे चांगले चांगले सामंत मारले गेले. डोंगरपूरचा उदयसिंग रावळ हा आपल्या दोनशें लोकांसह पडला; सालुंब्राचा रत्ना ठाकूर व त्याचे तीनशें चोंडावत सरदार या लढाईत खपले; मारवाडच्या राजाचा मुलगा रायमल्ल राठोड व त्याजबरोबरच मेरत्याचा खेतसी व रत्ना हे सर्व वळी पडले; आणि त्याचप्रमाणें सोनगडचा राव रामदास, झालावाडचा ओझा, गोकुळदास प्रमार आणि मेवाडचे चव्हाणवंशीय माणिकचंद व चंद्रभान असे सर्व संगराण्याकरितां धारातीर्थी पडले. मेवतचा हुसेनखान व दिल्लीच्या तख्तावरून पदभ्रष्ट झालेला लोदीकुळांतला राजपुत्र असे दोघे मुसलमान संगाला मिळाले होते, पण तेही याच लढाईत पडले.

याप्रमाणें चोहोंकडून संगराण्याकडे फार नुकसानी व नाश होऊन पुन: पराजयाचें अपेश घेऊन त्याला मागें परतावें लागलें. तेव्हां मुसलमानांनीं वीरश्रीनें उन्मत्त होऊन, रणांगणीं जीं शत्रुपक्षाचीं घायाळ होऊन किंवा मरून मनुष्यें पडलीं होतीं, त्यांचीं शिरें कापून त्यांचे त्यांनीं ढीग घातले, व या जयाचें द्योतक असें 'गाजी' हें नांव बाबरानें आपल्याला घेतलें. हें नांव त्याचे वंशजांकडे शेवटपर्यंत चालू होतें.

संगराणा परतला तो मेवतच्या डोंगरांकडे गेला, व तेथून जय मिळविल्याशिवाय चितोडराजधानींत प्रवेश करावयाचा नाहीं असा त्यानें निश्चय केला. ईश्वरकृपेनें

---

१. 'गाजी' हा आरबी शब्द असून त्याचा त्या भाषेंत 'गिजा करणारा' असा अर्थ होतो. 'गिजा' म्हणजे काफराचे पारिपत्य, आणि 'काफर' म्हणजे कुराणोक्त धर्म न मानणारे. या काफरवर्गात यहुदी, खिश्चियन, हिंदु, पारशी, जैन, बौद्ध वगैरे सर्व लोकांचा समावेश होतो. मुसलमानांनी धर्मसंबंधानें जगाचे दोन भाग केलेले त्यांच्या ग्रंथातून आढळतात: एक इमानी म्हणजे आस्तिक व दुसरा बेइमानी म्हणजे काफर किंवा नास्तिक. काफरांस जिंकण्यांत जे विजयी होत ते आपल्यास 'गाजी' म्हणत व त्यांशी लढत असतां जे मरत त्यांस 'षहीद' म्हणत. काफरांशी संग्राम करण्यांत व त्यांजबरोबर रण झुंजण्यांत त्यांस मोठा आनंद वाटतो व अशा लढाईस ते 'जिहाद' म्हणतात. लढाईत मारावयाचे जे काफर त्यास मुसलमान 'वाज बुल कतल' म्हणजे वध्य किंवा वधार्ह म्हणतात. काफरांस वधणे हें पुण्यदायक आहे असें कुराणांत लिहिले आहे आणि षहीद होईल (मरून जाईल) तर त्याला तात्काळ स्वर्ग मिळतो असें वचन आहे. या वचनावरच आजपर्यंत जगावर या मुसलमानांनीं कोट्यावधि मनुष्यप्राण्यांचा संहार केला! अस्तु. हिंदुस्थानचे मुसलमान बादशाह आपल्यास जो 'गाजी' हा किताब घेत तो त्यांच्या सनदेत, शिक्क्यावर, रुपयावर व मोहरेवर छापलेला असे.

२. क्षात्रधर्माचे लोक समरांत शत्रूला जिंकिल्यावांचून परत यावयाचे नाहींत असा तर त्यांचा बाणा असे. शत्रूकडून पराभूत होऊन माघारें तसेच घरीं कृष्णमुख घेऊन येणाऱ्या वीरांस त्याची आई, बाप किंवा बायको यांपैकीं कोणीही आपल्याजवळ येऊं देत नसत, व त्याशीं भाषण करीत नसत. त्याचप्रमाणें जातींतले लोक त्यास जातिबाह्य समजून त्याच्याशीं कोणताही व्यवहार ठेवीत

त्याला आयुष्य असतें तर त्यानें हा कृतनिश्चय शेवटास नेला असता. परंतु त्याला आयुष्य कमी झालें. तो त्या वर्षांतच मेवतच्या सरहद्दीवर बसवा येथें मरण पावला. त्याणें, बाबराचा सूड उगवीन तेव्हांच राजधानींत जाईन हा जो आग्रह धरिला होता, तो कोणा सरदारास न आवडून, त्यानें त्याला विषप्रयोग करून ठार मारिलें, असेंही कोणी ह्मणतात. यांत आश्चर्य नाहीं. रजपुतांमध्यें राजेलोकांचे मृत्यु बहुतकरून विषप्रयोगानें होत असल्याच्या लोकवार्ता ऐकूं येतात. तें कांहीं असो. त्याच्या मृत्यूच्या समयीं त्याला आपला निश्चय अपूर्ण राहिल्याबद्दल फार अस्वास्थ्य प्राप्त झालें. परंतु त्याच्या प्रधानादिकांनीं, 'आपण त्याविषयीं कांहीं खेद करूं नये, आपला निश्चय आम्ही पार पाडूं,' असें सांगून त्याचें समाधान केलें; तेव्हां त्यानें शांतपणें आपला देह ठेविला. वरील विषप्रयोगाच्या वार्तेवरून, रजपुतांत राजघात करण्याचें कृत्य ह्मणजे अगदीं साहजिक असलेलें दिसतें व त्यांच्या एकंदर पराक्रम-व-कर्तबगारीकडे पाहिलें असतां हा त्यांना मोठा कालिमा आहे असें कोणासही वाटेल.

प्राच्यराष्ट्रांतून एकपत्नीव्रताचा अभाव हें एक विलक्षण संकट व एक प्रकारचा रोगच असून तो सदाचरण आणि शरीररक्षण यांना अत्यंत घातक आहे. ह्या पूर्वदिग्राष्ट्रांकडे बघितलें तर त्यांतील राजांचा व लोकांचा असा अनेकपत्नीव्रताचा आचार पाहून तीं राष्ट्रें केवळ ज्ञानाच्या संबंधानें अगदीं बाल्यावस्थेंत आहेत असें ह्मणावें लागतें. रजपुतांच्या व इतर लोकांच्या इतिहासांतून पाहिलें तर अनेकपत्नीत्वाचा कांहीं विलक्षण अनर्थ दिसतो. कोणी सात वारांच्या सात बायका केलेल्या आढळतात व कोणी अयनांच्या व कोणी तिथींच्या याप्रमाणें निरनिराळ्या स्त्रिया वरल्याचे दाखले आहेत. यामुळें त्यांच्या जनानखान्यांत इतक्या मसलती आणि कपटें चालतात कीं, राज्यकर्त्यास आपला राज्यकारभार एकीकडे ठेवणें भाग पडतें. ह्मणजे, त्या प्रत्येक स्त्रीला आपल्या मुलाला गादी मिळावी अशी महत्वाकांक्षा असल्यामुळें, त्या अनेक युक्त्या व कपटें करून नवऱ्यास किंवा राज्यकर्त्यास विषप्रयोग करणें, मारेकरी घालणें अथवा गुप्त कट करून दंगे उठविणें, इत्यादि नीच कामें करण्यास बेधडक प्रवृत्त होतात असे दाखले इतिहासांतून सर्वत्र सांपडतात. त्यांना, यथाक्रम आपल्या पुत्रास राज्यवैभव भोगण्यास सांपडेल अशा प्रकारचा भरंवसा व दम नसतो. संग-

---

नसत. ह्या प्रकारची लज्जा व अपमान सोसण्यासाठीं जिवंत परत घरीं जाण्यास कोणीही क्षत्रिय किंवा रजपूत शत्रूला पाठ दाखवून समरांतून जात नसत. ते रणभूमीवरच मृत्यूची अपेक्षा करून पडत. भारतीयुद्धांत अर्जुनाच्या वीर्यपराक्रमाचें ठिकठिकाणीं वर्णन् आलेलें असून पराजयसमयीं अग्निकाष्ठें भक्षिण्यास तो उद्युक्त झाल्याबद्दल लिहिलें आहे. शेवटच्या अठरा दिवसांचे महायुद्धांत भीष्म पराभूत झाल्यामुळे समरामध्यें शरपंजरींच मृत्यूची वाट बघत पडले होते!

तिच्या वैभवेच्छेस तृप्त करावयाचें होतें. परंतु तसें त्याजकडून मुळींच घडलें नाहीं. तो गादीवर बसल्यावर बंदीजनांच्या स्तुतिपाठांनीं तो आपलीं पूर्वकृत्यें आणि गुप्तवचनें कांहीं काळपर्यंत जणूं काय अगदीं विसरून, त्यानें तिला तसेंच तिष्ठत बसविलें. इकडे, पाणिग्रहण केलेल्या व वाग्विवाह लावलेल्या चितोडाधिपतीकडून आपल्याला आज बोलावणें येईल, उद्यां बोलावणें येईल, अशा मार्गप्रतीक्षेंतच तिचे दिवस चालले. तों वर लिहिल्याप्रमाणें ह्याडिया राजाकडून मागणी आली. तोही चितोडच्या राजापेक्षां कांहीं कमी योग्यतेचा नव्हता. तसाच तो रत्नसिंगापेक्षां पराक्रमांतही कमी नव्हता. मेवाडचे महाराणे सिसोदिये व ह्याडिया रजपूत हे पूर्वापर स्नेही असून कुरुक्षेत्रीं शहाबुद्दीन गोरीबरोबर ते ऐकमत्यानें लढले असल्यामुळें तर विशेष निकट संबंधी झाल्यासारखे झाले होते. बुंदीचे हे ह्याडियाराजे जरी मेवाडचे मांडलिक नव्हते तरी ते पूर्वीपासून चितोडास श्रेष्ठतेचा मान देत असत, व हरवक्त चितोडाकरितां ते आपले रक्त पाडण्यासही सज्ज असत. अशा प्रकारचा त्यांचा जुना स्नेहधर्म असून, बुंदीच्या राजाचा चितोडच्या राण्यास चिडवून त्याचा अपमान करण्याचा मुळींच इरादा नव्हता, हें आतां वेगळें सांगणें नकोच. त्याला जर, आपण वरितों ही अंबेरची कन्या अगोदरच राण्यानें वरिली आहे असें माहित असतें, तर त्यानें तिच्याशीं हा पुनरुद्वाह केला नसता; व परस्त्रीअपहाराबद्दल जें पुढें त्याला शासन भोगावें लागलें तेंही लागतेंना. ह्याप्रमाणें वस्तुतः मुख्य दोष खुद्द रत्नसिंग राण्याचाच असून, त्याणें उलट ह्याडिया राजाशीं मत्सर आरंभिला. एके दिवशीं रत्नसिंग व ह्याडिया राजा असे वसंतकाळीं मृगयेला गेले असतां तेथेंच त्या दोघांचें द्वंद्व जुळून त्यांत दोघेही एकमेकांच्या शस्त्रघायांनीं मृत्यु पावले. ह्याप्रमाणें रत्नसिंगानें अवघीं पांच वर्षें राज्य केलें. तरी, तितक्या काळांत त्यानें बाबराला कांहीं पुढें येऊं न देतां आपली मेवाडची हद्द जशीच्या तशीच कायम राखिली होती. रत्नसिंगाचे मागून त्याचा धाकटा भाऊ विक्रमाजित हा चितोडाचे गादीवर बसला.

विक्रमाजित हा वि० सं० १५९१ ह्मणजे इ० स० १५३५ या वर्षीं राज्याधिकारी झाला. हा आपल्या वंशांत नांव बुडविणारा आणि वैभव गमावणारा असा निघाला. तो नादान, नालायक व कमकुवत होता. भलभलते छंदफंद करून

१. बेकायदा ह्मणजे कायद्यानें जेथें कारभार चालत नसून, राजाची इच्छा तोच कायदा अशा धोरणानें जेथें राज्य चालतें तें राज्य आणि वंशपरंपरेचे राजे जेथें आहेत ते मुलूख एकसारख्या भरभराटीनें व शांतिसुखानें असलेले कधींही पाहण्यांत यावयाचे नाहींत. याचें कारण उघडच आहे कीं, राजवंशांत सर्वच पुरुष सदिच्छावान्, सन्मार्गवर्ती, शूर, पराक्रमी, उदार, धीर, गंभीर व लोकप्रिय, असे असण्याचा असंभव. प्रजेकरितां आपण राजे, आपल्याकरितां प्रजा नव्हे, रा-

सरदारांच्या मनांतून तो दिवसानदिवस उतरत चालला. त्याणें पहिलवान व मल्ल यांच्या कुस्त्या लावून त्यांस मोठमोठीं बक्षिसें द्यावीं. इतर राजकीय व लष्करसंबंधी व्यवस्था ठेवण्याकडे त्याचें एकंदरीनें कमी लक्ष होतें. आपले प्रतिस्पर्धी व शत्रु यांच्या फौजा व लष्कर कशा पद्धतीनें वाढत व सुधारत आहे इकडे धोरण न ठेवितां त्यानें धूम पायदळ वाढविण्याचा क्रम चालविला. रजपूत सैन्यांत नुस्तें पायदळ वाढवून काय उपयोग होता? तिकडे राऊत, शिलेदार, यांचें सैन्य मुख्य असून त्यांजकडूनच आजपर्यंत राजस्थानचें वैभव वाढलें होतें. पण हें त्याणें मनांत आणिलेंच नाहीं. दिल्लीचे बादशाहाकडे तोफा व बंदुकांची वृद्धि होत चालली आणि विक्रमाजिताकडे पायदळांतच भर पडत होती. तसेंच, तोफा व बंदुका यांचा ह्मणजे दारूचा उपयोग लढाईत केल्यानें यशप्राप्ति होते याची समजूतच रजपुतांना होत नसे. त्यांचे पूर्वापर चालत आलेले तीरकमठे, तरवारी, भाले यांच्या अभिमानांतच ते गढून गेले होते.[1] सारांश, शत्रूंची लढाईच्या व युद्धाच्या

ज्यांतली संपत्ति ही आपल्या मालकीची नसून तिचे स्वामित्व प्रजेकडे आहे तेव्हां तिच्या धोरणानें व संमतीनें आपला राज्यकारभार ठेवावा; इत्यादि प्रकारच्या उदार कल्पना सदैव मनांत वागवून त्याप्रमाणें राज्योपभोग भोगणारे सुसंस्कृत व आहोभाग्य राजे आजपर्यंत या भारतभूमीवर फारच थोडे झाले असतील. दुष्टबुद्धीचे, दुराचारी, भीरु, शेंदाड, कृपण, डौली, मिजासी, आणि स्वच्छंदी अशी राजपंक्तिच हिंदुस्थानांतील राजावलींत बहुतकरून सांपडेल! विलायतेंत व इतर सुधारलेल्या राष्ट्रांत राजांचे असे नानाढंग चालून प्रजेला दुःख होईल ह्मणून तख्तावर येणाऱ्या राजाकडून किंवा राणीकडून अगोदरच कौलकरार वगैरे लिहून घेऊन त्यांस आपल्या बंधारणांत ठेवितात आणि मग राज्याभिषेकसभारंभ करितात. तसेंच, लिहून मिळालेले कौलकरार बरोबर रीतीनें अमलांत राहावे व राज्याधिकाऱ्यानें उन्मत्त होऊं नये ह्मणून त्याजवर पाहणी करण्यास सभ्य लोकांच्या सभा स्थापिलेल्या असतात. ते सर्व प्रकारचे बदोबस्त करितात: राज्यावर कोणाचा वारसा आहे; आपल्या राज्यांत कमीजास्त काय आहे; चूकवाक कशांत आहे; इत्यादि सुधारणेचे सर्व भाग वरील सभा करितात. यामुळे हिंदुमुसलमान राजांसारखे उठल्या बसल्या उगाच फंदफितूर, कुटुंबकलह, राजघात, विषप्रयोग, परक्याचा हात, मसलती, इत्यादि निंद्य प्रकार राजवंशांत चाललेले आढळत नाहींत. तर एका धोरणानें व लोकसमाजाचे अनुकूलतेनें बिनबोभाट आणि अब्रूनें काम चालते. यांत जें सुख आहे त्याचा वरील प्रकारच्या बेकायदा आणि परंपरेचे राजे यांच्या राज्यांत मुळीच अभाव असतो.

१. तोफा, बंदुका आणि दारूचा उपयोग हिंदुस्थानांत कोणासही ठाऊक नव्हता. येथील युद्धें ह्मणजे तीर, भाले, तरवारी, बर्च्या, कटारी वगैरेंनीं चालत. पुढें युरोपियन लोकांकडून युद्धांत दारूचा उपयोग करण्याची युक्ति निघून ती युक्ति मुसलमानांनीं उचलली, व तेव्हांपासून हिंदुस्थानांत दारूची सुरवात झाली. मुसलमानांकडूनच हिंदुस्थानांत दारू आली याबद्दलचें प्रमाण ह्मटलें ह्मणजे तो व्यापार अद्यापि त्यांजकडेसच आहे, हें होय. असे कांहीं व्यापार व धंदे हिंदु-

कामांत ज्यास्त ज्यास्त सुधारणा होत चालल्यामुळें जयाचा वांटा त्यांजकडे जात चालला यांत आश्चर्य नाहीं. विक्रमाजिताची राज्यमर्यादा अनुदिन कमी कमी होत चालली. सर्व शत्रु व प्रतिस्पर्धी यांस आपआपला हात उगवण्यास या राण्याचे कारकीर्दीत पूर्णपणें फावलें, इतक्या प्रकारची गचाळ कारकीर्द विक्रमाजितानें चालविली. भिल्ल व मेर या डोंगरी व रानटी लोकांनीं चितोडच्या सिवेंतून बिनदिक्कत गुरें चोरून हांकून न्यावीं, व त्यांवर स्वार पाठविण्याचा हुकूम झाला तर स्वारांनीं हंसून उपहासानें ह्मणावें कीं, 'पायदळ पाठवा ह्मणजे ते त्यांचें पारिपत्य करतील !'

विक्रमाजिताचे राज्यास 'पपाबाईचें राज्य'[1] असें उपहासानें लोक ह्मणत. ह्या 'पपाबाईचे राज्या'चा फायदा आपण करून घ्यावा असें गुजराथचा सुलतान बहादूर यानें मनांत आणिलें. बहादूर याचे पूर्वी जो मुजफर ह्मणून गुजराथचा

---

स्थानांत चालू आहेत कीं, ते ज्यांजकडून मूळ वहिवाटींत आले त्यांजकडेसच ते धंदे व ते व्यापार राहिले आहेत. दारूचा व्यापार व दारू करण्याचे कारखाने जसे मुसलमानांनीं आणिले तसे कागदाचे कारखानेही त्यांजकडूनच इकडे आले व ते दोन्हीही त्यांजकडेसच आहेत. दारूवाले व कागद करणारे तेवढे सर्वत्र मुसलमान आढळतील. असो. दारू, बंदुका, कवाइती फौज, त्यांचे एकसारखे पोषाख, इत्यादि लष्करी सुधारणेंत आलीकडील राष्ट्रें फार पुढें गेलीं आहेत. त्यांजकडे हिंदुमुसलमान राजांचें लक्ष गेलें नाहीं. या लष्करी व्यवस्थेच्या व्यंगामुळेंच इकडील राजे पराभूत होऊन लष्करी कामांत वाकब अशा इंग्रज लोकांकडे सर्व हिंदुस्थानाचें स्वामित्व गेलें. राज्यभाग हा केवळ शहाणपणाचाच भोगवटा आहे असें कोणी समजूं नये. तें वैभव मिळविण्यास व तें आपल्या हातीं राखावयास शहाणपणा आणि बळ ही दोन मुख्य साधनें आहेत. नुस्त्या शहाणपणानेंच राज्यें चालती तर नाना फडणवीस येवढा धूर्त, चतुर व शहाणा होता; तर शिंद्याचें बळ कमी झाल्याबरोबर कैदेंत कां गेला असता ? तेव्हां लष्करी व्यवस्था ही इतर सुधारलेल्या राष्ट्रांच्या बरोबरीनें असली तरच टिकाव लागतो, नाही तर धूळधाण होऊन जाते हें फार दिवस इकडील राजांस समजलें नव्हते. तरी सैन्यव्यवस्थेत चतुर अशा महाशूर महादजी शिंद्यानें ही गोष्ट पूर्णपणें समजून त्याप्रमाणें त्यानें आपल्या लष्कराचे कंपू कवाइती वगैरे शिकवून तयार केले होते. व त्याचप्रमाणें पुढें जेव्हां सुधारलेल्या लष्कराचे प्रभाव अनुभवास येऊं लागले तेव्हां पेशवे, होळकर, शिंदे, मोंगल, हैदर नाईक वगैरे सर्वांनीं आपापलीं लष्करें कवाइती वगैरे शिकवून तयार करविलीं. या प्रकारचें धोरण विचारी राजांस असते. आणि ते दुसऱ्याची सुधारणा पाहून तत्काल तिचें अनुकरण करितात. परंतु बेकायदा राज्य असले ह्मणजे पुढील वंश वाईट निघून विचारी राजांनी जीं लष्करें वगैरे सुधारलीं असतील ती सर्व व्यवस्था मोडून जाते असा नियम आहे. व त्याप्रमाणें वरील सर्व राज्यें विशकलित झालीं हें सर्वांना विदित आहेच !

१. पूर्वी या नांवाची एक राणी रजपूत लोकांत होऊन गेली, तिच्या अव्यवस्थित राज्याविषयीं राजस्थानांत प्रख्याति असून त्यावरून वरील ह्मण रजपूत लोकांमध्यें चालू झाली.

सुलतान होता, त्याला पृथ्वीराजानें कैद करून रायमल्लाकडे चितोडास नेलें होतें व त्याजपासून पुष्कळ पैसा आणि सातशें घोडे खंडणी ह्मणून, घेतली होती. ही गोष्ट त्याचे मनांत असून त्याचें उटें काढण्यास प्रस्तुतचें 'पपाबाईचें राज्य' चांगलें आहे असा त्यानें विचार केला. तेव्हां त्याला मंदोडच्या ठाकुरानेंही आपल्या पलटणी मदतीस दिल्या. ह्याप्रमाणें सुलतान बहादूर हा विक्रमाजित राण्यावर चालून आला. तो बुंदी परगण्यांतील लोईचा गांवीं उतरला. तेव्हां विक्रमाजित न भितां आपल्या पायदळी लष्करासह त्याजवर आला. परंतु त्याचा तितपतच उपयोग झाला. घोडेस्वार व शिलेदार होते तेवढे चितोडाचे संरक्षणार्थ समरांतून पळून गेले. तेव्हां अर्थातच बिचाऱ्या नुस्त्या पायदळाच्यानें काय होणार होतें? सारांश, हा मेल्या बापाचा मुलगा—संग्रामसिंहपुत्र—लष्करी कामांत अजून बालच होता.

पहिल्यापासून चितोडच्या गादीविषयीं सर्वांची पूज्यबुद्धि असून प्रसंगीं चितोडाचें संरक्षण करण्यास आजूबाजूचे सर्व रजपूत राजे एकमतानें साह्य करीत अशी पूर्वीपासून रीत चालत आली होती. त्याप्रमाणें या वेळींही चितोडच्या अभिमानी स्नेही ठाकुरांनीं, 'रानटी मुसलमानां'ची स्वारी येऊन विक्रमाचा पराजय झालासें पाहून धांव घेतली. देवळा येथील सुरजमल्लाचा वशीय राजपुत्र याणें ताबडतोड आपली स्वामिनिष्ठा दाखविण्याकरितां आपलें सैन्य चितोडाचे मदतीस पाठविलें. त्याचप्रमाणें, बुंदीच्या राजानें ५०० हाडिये लोकांची शूर टोळी विक्रमाजिताचे बचावाकरितां पाठविली. तसेच सोनीगड व झालावाडचे आणि अबूचे देवरा, राव, वगैरे रजवाड्यांतले पुष्कळ राजे राण्याच्या साह्यार्थ आपापली सैन्यें घेऊन आले. परंतु बहादूरशाह सुलतानाची तयारी कांहीं वेगळीच होती. व तिच्या योगानें त्याची ही स्वारी फत्ते होऊन रजपुतांचा अखेरीस अगदींच मोड झाला. तो प्रकार असा:— बहादूर याजकडे, लाब्रीखान फिरंगी नांवाचा पोर्च्युगीज सैन्याधिपति किंवा सैन्यशिक्षक असल्यामुळें, त्याचे लष्कराची अगदीं कडेकोट तयारी होती. त्याजकडे दारूगोळा व तोफा हीं जबरदस्त मारक शस्त्रास्त्रें यथेच्छ व तयार होतीं, सर्व लष्कर

१. संगराणा मेला तेव्हा विक्रमाजित गर्भस्थच होता.

२. चंदाच्या कवितेत ठिकठिकाणीं नळगोळे, अग्न्यस्त्रे, रणांतला वणवा, वगैरेचीं नांवें येऊन दारू, तोफा वगैरेच्या वर्णनासारखी वर्णने आलेलीं आढळतात. परंतु चंदाच्या वेळीं इकडे दारूगोळा व तोफाबंदुका यांची कल्पना व योजना मुळींच नव्हती. यावरून हीं वर्णनें मागाहून कोणीं चंदाच्या ग्रंथांत ढकललीं असावीं. हिंदुस्थानांत दारूचा व तोफाबंदुका यांचा उपयोग प्रथमत: बाबरानें केला व तेव्हांपासून त्याचा इकडे प्रसार झाला. तेरावे शतकांत चितोडावर अल्लाउद्दीनानें पहिली गर्दी केली तेव्हां दारूगोळा वगैरेंचा उपयोग झालेला कोठें इतिहासांत आढळत नाहीं. तो बाबरापासून आढळतो. आणि मुसलमानांस जे अलीकडे शूर व अभिमानी रजपुतांवर जय

लाब्रीखानाच्या सांगण्याप्रमाणें चालत असल्यामुळें फिरंगी लोकांच्या युद्धकलेचें हें प्रतिबिंब भासत होतें. लाब्रीखान हा लष्करी कामांत त्या वेळीं मोठा कुशल होता. त्यानें मोठमोठे सुरुंग पाडून किल्ल्याचे तट उडवून दिले. त्या वेळीं तेथें बुंदीचा सरदार व त्याचे शूर पांचशें हाडिये लोक अशे तटाचें संरक्षण करण्याकरितां उभे होते. ते सर्व या सुरुगाच्या धूमधडाक्यांत कोणीकडे नाहींसे झाले. पुढें दुर्गाराव आणि सतू व दुदू हे दोघे चोंडावत सरदार आपल्या लोकांनिशीं सुलतानाचे फौजेबरोबर मोठ्या शौर्यानें पुष्कळ वेळ लढले व त्यांणीं कित्येक हल्ले मागे हटविले; त्याचप्रमाणें रजपूत लोकानी धैर्य व अवसान धरावें ह्मणून ह्या वेळी खुद्द विक्रमाजिताची आई, राठोडकन्या जी राणी जवाहीरबाई, इणेंही लढाऊ सरदाराचा पोषाख करून आपल्या लोकासह शत्रूवर हल्ला केला. परंतु कांहीं झाले नाहीं. राणी जवाहीरबाई तर त्याच हल्ल्यात मारली गेली. ह्याप्रमाणे सर्वांशी अपजयाचा वांटा पदरी आला. चितोडास तर सुलतानाचा वेढा पडला व आतां पुढें निभावणी लागावयाची नाहीं, अशी रजपुताची खात्री झाली. चितोडच्या राजवंशाचे रक्षणाकरिता प्राण द्यावयाचे असा पहिल्यापासूनच सर्वांचा पूज्यभाव आणि अभिमान असल्यामुळे, ह्या वेळी संगराण्याचा उदयसिंग हा एकच अवशिष्टपुत्र शिशु होता त्याचें कसे तरी या संकटातून संरक्षण व्हावें ह्मणून व पुढें काय करावयाचें याबद्दल सर्वांच्या मसलती चालल्या. तेव्हां त्यानी असे ठरविले की, 'राजपुत्रास बुंदी येथील राजपुत्र सुरतान (शूरस्थान) याचे स्वाधीन करून आपण सर्वांनीं जोहार करावा. परंतु, जोहार करण्यापूर्वी प्रथमत: आपल्या स्त्रियानी अग्निकाष्ठ भक्षण केली पाहिजेत, ह्मणजे मग आपल्या मागे पाश राहिला नाही.' असा त्यांणीं विचार करून स्त्रियाच्या अग्निकाष्ठभक्षणाची तयारी चालविली. त्यांणी किल्ल्याच्या खडकांत एक मोठा थोरला हौदासारखा खड्डा खणून त्यांत दारू वगैरे ज्वालाग्राही पदार्थ पसरिले. नंतर उदयसिंगाची आई कर्णावती, ह्मणजे अर्जुन हाडिया या शूर सरदाराची बहीण आणि संगराण्याची विधवा स्त्री, हिणें सर्व रजपूतस्त्रियांस बोलावून आणून, 'आपल्या रीतीप्रमाणें जन्माचें सार्थक करण्याचा प्रसंग आला आहे,' असें त्यास सांगितले; व तो सर्व स्त्रियांचा समाज त्या आगीच्या खाईत जा-

---

मिळत गेले हा सर्व दारूगोळ्याचा त्याजवर उपकार होय. दारूगोळा नसता तर ते असे विजयी झाले नसते. वर बहादुराकडे जो लाब्रीखान फिरंगी असल्याचे लिहिलें आहे, हा कोणी वास्को डी गामा याचे लोकापैकीं असावा.

१. उदयसिंग हाही संगराणा मेला तेव्हां गर्भस्थच होता. यावरून संगाचे मागे त्याच्या दोन स्त्रिया गर्भवती होत्या असे दिसते.

ऊन उभा राहिला. तेव्हां तत्काळ त्यास बत्ती दिल्याबरोबर त्या सर्व स्त्रिया उडून गेल्या. ह्याप्रमाणें तेराहजार रजपूतस्त्रिया या अग्निकुंडांत होमल्या असा लेख आहे! स्त्रियांचा निकाल झाल्यावर देवळाच्या ठाकुरानें सांगितलें कीं, 'आतां थांबून काय करावयाचें आहे?' असें ह्मणून त्यांणीं चितोडचे दरवाजे उघडले व सर्व लोक सुलतान बहादूर याचेवर जाऊन पडले आणि त्यांणीं आपला शेवट करून घेतला.

तेव्हां अर्थात् बहादूर याचा विजय झाला. ही गोष्ट ज्येष्ठ शुद्ध १२, वि० सं० १५८९ ह्मणजे इ० स० १५३३, किंवा फेरिस्ता याच्या लिहिण्याप्रमाणें हिजरी सन ९४९ या वर्षी घडली. बहादूर चितोडास जाऊन बघतो तों तेथें त्यास काय आढळलें? सर्वत्र प्रेतमय आणि शून्य! हजारों लोक विषप्रयोगानें, आत्महत्येनें व कटारींनीं वगैरे मरून पडलेले दिसले. शत्रूकडून कैद होऊन अपमान सोसण्यापेक्षां आपल्या हातांनींच आपला व बायकापोरांचा शेवट झालेला बरा, असा जो रजपुतांचा अभिमान आहे, त्याप्रमाणें त्यांणीं करून निर्मनुष्य असें चितोड शहर शत्रूच्या स्वाधीन केलें! या गर्दीत एकंदर बत्तीसहजार लोक मारले गेले असें ह्मणतात. चितोडास 'जोहारा'चा संस्कार होऊन सर्व संहार झाल्याचा राजस्थानच्या इतिहासांत हा दुसरा प्रसंग होय.

बहादुरानें चितोड आपल्या कबज्यांत घेतलें खरें. पण त्याचा मुक्काम तेथें एक पंधरवड्यावर झाला नाहीं. तो या विजयाचा आनंद मानून जरा विसांवा घेतो आहे तोंच बंगाल्यांतून हुमायुनाची स्वारी त्याला हांकून देण्यास आली. हा योग चमत्कारिक घडला. तो असाः—हुमायून हा बाबराचा मुलगा असून बाबर हा संगराण्याचा शत्रु होता. परंतु, बाबरानें संगराण्याच्या गुणांचें जें वर्णन लिहून ठेविलें होतें तें हुमायुनास सर्व माहित असून तो स्वतः आपल्या बापाबरोबर बियाना येथें जो जय झाला त्या वेळीं हजर होता. व त्याचाही संगाच्या वंशजांविषयीं सप्रेमभाव होता. इतक्यांत वर लिहिल्याप्रमाणें सुलतान बहादुराची स्वारी गुजराथेंतून चितोडावर आली आणि राण्याचा पराजय होण्याचा प्रसंग आला. तेव्हां राणी कर्णावती इणें हुमायुनास राखी पाठवून असा निरोप कळविला कीं, 'तुह्मी माझे भाऊ आहांत. तर अशा वेळीं मला साह्य करून आमची अब्रू राखा.' ह्या राखीचा हुमायुनास मोठा आनंद होऊन त्याणें आपल्या या राखीबंद बहिणीस

१. पूर्वी शत्रूच्या बायका हातीं लागल्या ह्मणजे मोठा विजय झाला असें समजत. आणि हा अपमान आपल्या बायकांस भोगावयास लावावा त्यापेक्षां त्या आपल्या देखतांच मेलेल्या बऱ्या असें वाटून रजपूत लोक हा घोर उपाय करीत असें दिसतें.

असें प्रत्युत्तर पाठविलें कीं, 'मी तुमचा राखीबंद भाई झालों आहें; तेव्हां आतां तुम्ही आलेल्या संकटाविषयीं कांहीं एक भीति बाळगूं नका.' आणि त्याप्रमाणें तो आपली तयारी करून चितोडास सोडविण्याकरितां येतो आहे तों इकडे वर लिहिल्याप्रमाणें सर्वांची आहुति होऊन चितोड बहादुराच्या ताब्यांतही गेलें होतें. परंतु हुमायुनानें आपल्या दत्तवचनाप्रमाणें येऊन, मंदोडावर जो बहादुराचा तळ पडला होता तें शहर काबीज करून घेऊन पुन: बहादुरास चितोड येथून हुसकून दिलें. व विक्रमादित्य जो वरील संहारांतून बचावून राहिला होता त्यास फिरून आणून त्याच्या गादीवर त्याला मात्क्यान् बसविलें. ह्याप्रमाणें रजपुतांच्या राण्यांकडील राखीचा प्रभाव होता.

वरील रक्षाबंधनाचा असाच चमत्कार झाला कीं, ह्या राखीनें केवळ हुमायूनच एकटा चितोडच्या राणीचा भाऊ झाला नाहीं; तर त्याचे पुढें त्याचा मुलगा प्रसिद्ध अकबर, त्याचा पुत्र जहानगीर, जहानगीराचा मुलगा शाहजहान आणि शाहजहानाचा मुलगा–हिंदूंचा परम द्वेष्टा जो औरंगजेब–तोही, अनुक्रमें चितोडच्या राणीचे 'राखीबंदभाई' अशाच प्रकारचें नातें ठेवीत आले. औरंगजेबानें आपलें स्वसृप्रेम फारच उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे. व हें त्याच्या स्वभावरीतीवरून पाहिलें असतां अगदीं चमत्कारिक भासण्यासारखें आहे![२]

ह्याप्रमाणें विक्रमाजित सुदैवानें पुन: राज्यारूढ झाला. त्याजवर आजपर्यंत अ-

---

१. रजपुतांमधील ह्या रक्षाबंधनाच्या चालीचा खुलासा आह्मीं मागें (पृ० ५० येथें) लिहिला आहेच. राजस्थानाचा इतिहास लिहिणारा कर्नल् टॉड् हा या रक्षाबंधनांविषयीं आपली स्वत:ची अशी गोष्ट लिहितो कीं:—"मी उदेपूर, बुंदी आणि कोटा येथील तिन्ही राण्यांचा व उदेपूरच्या राण्याची अविवाहित बहीण चंदबाई इचा 'राखीबंद भाई' झालों आहें व त्यांजकडून मला हीं रक्षाबंधनें (राख्या) मिळालीं आहेत. याचप्रमाणें राजस्थानांतील अनेक संस्थानिकांच्या बायकांकडून मला राख्या आल्या असून मी त्यांचा भाऊ झाल्याबद्दल मीं त्यांना पत्रोत्तरेंही पाठविलीं आहेत. माझ्या सहा वर्षांच्या अधिकारांत ह्या प्रकारच्या राख्या मला पुष्कळ मिळाल्या व त्या मीं माझ्या प्रिय भगिनींची आठवण ह्मणून विलायतेस नेल्या." इ०.

२. औरंगजेबानें या पत्रांत प्रथमत: 'प्रिय व सद्गुणवती भगिनी !' असें संबोधन देऊन शेवटीं 'आपलें कुशल व कल्याण इच्छितों' अशा प्रकारच्या स्पष्ट शब्दांनीं आपली तिजवरील भक्ति व प्रेम दाखविलीं आहेत. रजपुत स्त्रियांस श्रेष्ठाला 'राखीबंदभाई' बनवून त्याजकडून आपलें कल्याण करून घेण्याचें हें अपूर्व व अद्वितीय साधन मिळालें आहे व येणेंकरून त्यांणीं मोठमोठ्या सुधारलेल्या राष्ट्रांतही अशक्य असें प्रेमबंधन राखून ठेवण्याचें उत्कृष्ट साधन साधिलें आहे असें ह्मणावें लागतें. जे मुसलमान लोक हिंदूंना व त्यांच्या धर्माला पाण्यांत पाहणारे ते वरील रक्षाबंधनानें खऱ्या बहिणभावंडांपेक्षांही एकमेकांविषयीं अधिक सवत्सल होतात !

नेक संकटें येऊन त्यालाही बहुत दुःखें भोगावीं लागलीं. परंतु त्याचा परिणाम कांहीं एक झाला नाहीं. त्याला इतक्या दिवसांच्या व प्रसंगांच्या अनुभवानें कांहीं एक शहाणपणा ह्मणून आला नाहीं. तो पुनः आपले पूर्वीचे वेडेवेडे चार करून आपल्या पदरच्या वृद्ध व थोर सरदारांचा भरदरबारांत अपमान करूं लागला. हा त्याचा पहिल्यापासूनच स्वभाव होता. तो इतकेंच करून राहिला नाहीं; त्याणें लोकांना अप्रिय व तिरस्कार्य होण्यास दुसरीं अनेक दुष्ट कृत्यें केलीं. त्यांतही त्याणें अतिनिंद्य व अधमपणाचें जें कृत्य केलें तेणेंकरून तर त्याची प्रजा त्याजविषयीं अत्यंत नाखुष होऊन, त्यांणीं अखेरीस आपली राजनिष्ठा वगैरे सर्व एकीकडे ठेविली व त्याचा नाश करून त्याचे गादीवर दुसरे कोणास बसविण्याचा त्यांणीं विचार चालविला. हें अधमपणाचें कृत्य ह्मणजे, त्याचा बाप संगराणा याच्या दैवदुर्विलासांत संगाला आश्रय देऊन ज्याणें पुढील सुखाचे व वैभवाचे दिवस दाखविले त्या वृद्ध करमचंदास (कर्मचंदास) या नराधम विक्रमाजित राण्यानें भरदरबारांत ठार मारविलें. त्या वेळीं लोकांना इतका संताप व आवेश आला होता कीं, रजपूतलोक आपल्या राजास देवासारखा मानतात, परंतु ह्या वेळीं तो मानसन्मान एकीकडे ठेवून सर्व सरदार एकदम उठून उभे राहिले व त्या वेळीं त्या दरबारांतील सरदारांपैकीं मुख्य असणारा कानजी चोंडावत हा मोठ्यानें ह्मणाला, 'भाई सरदार लोक हो, आपणास आपल्या राज्यवैभववृक्षाचें सौख्यफल मिळेल असा समय आला होता; परंतु आपल्याला तें कच्चें फळच खाऊन टाकणें भाग झालें आहे!' या त्याच्या अपमानकारक भाषणावर तो मानी राणा ह्मणाला, 'बरें आहे, याचा परिणाम तुह्माला उद्यां समजेल.' असें ह्मटल्याबरोबर सर्व दरबार चालता झाला.

---

१. राजावर राष्ट्राचा दाब असल्यावांचून राजा नीट वर्तत नाहीं. राजेलोक हे स्वतः किंवा निर्भयपणाने अथवा कधीं कधीं सत्तामदानें अनीतीस प्रवृत्त होतात. याकरितां राष्ट्राचा दाब कायद्यांच्या आणि सभादींच्या योगानें आपल्या राजावर असावा हें तत्त्व पाश्चात्य राष्ट्रांस पूर्णपणें समजलें आहे. हिंदुमुसलमानांस हें तत्त्व कधींही कळलें नाहीं. तरी त्यांसही आतां पाश्चात्यांच्या सहवासानें ही राजनीति समजूं लागली आहे. राष्ट्रीय विचार सर्वदा न्यायाचा असतो. त्यास कधीं कधीं व्यक्तिविषयक विचार अपवादक होतो परंतु तो अपवाद धरावयाचा नाहीं. व्यक्तीचें लक्ष्य स्वार्थाकडेच असतें; पण राष्ट्राचें लक्ष्य न्यायाकडे असतें; हा विचार मनांत आणिला ह्मणजे राष्ट्रीय मताची थोरवी आणि जरूरी तेव्हांच लक्ष्यांत येईल. हे प्रौढ विचार, ज्ञान विद्या आणि स्वातंत्र्य जसजसें वाढेल त्या त्याप्रमाणें लोकांना सुचतील. तोंपर्यंत लोक दुष्ट व मनस्वी राजाचा छल सोसून त्याचे गुलाम होऊनच राहतील व देशप्रीति सोडून केवळ पोटाचे भक्त होतील हें उघड आहे!

२. भारतीय कथेंतील द्रौपदीवस्त्रहरणाचे वेळीं तेथें सभेंत हजर असलेले भीष्म-द्रोण-कृपाचार्य व कर्णादि महाजन हे त्या अनन्वित कृत्याबद्दल कांहीं एकून बोलतां खालीं माना घालून मुकाट्यानें बसले; त्यापेक्षां वरील दरबारी लोक अधिक स्तुत्य होत यांत संशय नाहीं!

सून तिच्या वरील वर्तनावरून तिचें तें नांव अगदीं अन्वर्थ होतें असें ह्मणावें लागतें. ही दाई खिचीवंशीय रजपुतानी होती. असु. त्या बिचारीनें आपल्या मृत पुत्राचें दहन करून त्याची राख शोकाश्रूंनीं भिजविली. तिला जो शोक झाला असेल तो अनावर होता हें सांगणें नकोच. परंतु, असा पुत्रशोक करीत बसण्यांतच तिला आपला वेळ घालवावयाचा नव्हता. तिणें तें शोकदु:ख सर्व एकीकडे ठेवून ताबडतोब ती राजपुत्राचा सांभाळ करण्याकरितां निघाली.

इकडे तो विश्वासुक न्हावी मुलाची पांटी घेऊन निघाला तो किल्ला उतरून चितोडच्या पश्चिमेस कांहीं कोसांवर नदीच्या कांठीं दाईची वाट बघत बसला. यांत ही एक सुदैवाची गोष्ट झाली कीं, तो न्हावी किल्ला उतरून शहरांत येईपर्यंत तें बालक जागें झालें नाहीं. नंतर त्या न्हाव्याला दाई जाऊन मिळाली व तीं दोघेंजण त्या मुलाला घेऊन देवळा येथील सिंगराव याजपाशीं आसरा मागूं लागली. सिंगराव याचा बाप बाघजी हा चितोडच्या राण्याचा मित्र असून तो चितोडास मदत करीत असतांच युद्धांत पडला होता. असा त्याचा स्नेहसंबंध होता तरी सिंगरावानें भीतीमुळें त्या मुलाला आसरा दिला नाहीं. तेव्हां ती बिचारी दाई डोंगरपूर येथें गेली. तेथील अधिकारी रावळ एसकर्ण (यशकर्ण) व देवळाचा ठाकूर वरील सिंगराव हे चितोड येथील राजवंशीय शाखेंतील होते, इतकेंच नव्हे, तर ते त्या वंशांतील वडील शाखेंतले होते. तेव्हां त्यांना स्ववंशाभिमानानें या एकुलत्या एक बालाचें संरक्षण करण्याची सद्बुद्धि होईल असें त्या दाईला वाटलें होतें. परंतु सिंगरावानें तर वरच्याप्रमाणें भीरुपणाचें उत्तर दिलें. ' व याचप्रमाणें एसकर्ण रावळानेंही असेंच सांगितलें कीं, 'या मुलाचें अशा आणीबाणीच्या वेळीं मीं आश्रय देऊन संरक्षण करणें मोठ्या धोक्याचें आहे; तेव्हां तें मजकडून होऊं शकणार नाहीं.' हें रावळाकडील उत्तर ऐकून ती दाई ईडर प्रांतांतून आणि अरवली डोंगराच्या खोऱ्यांतून त्यांतील भिल्ल लोकांच्या साह्यानें कुमळमेरास गेली. तेथें जाऊन जो बेत तिणें योजिला तो जरी न्यायदृष्टीनें चांगला होता तरी एका प्रकारें मोठ्या धारिष्टाचा होता. कुमळमेर येथें असासाह नांवाचा डेप्राजातींतील श्रावक गृहस्थ तेथील सुभेदार होता. त्याजकडे जाऊन त्याच्या परवानगीनें तिणें त्याची भेट घेतली व त्याच्या मांडीवर त्या राजपुत्रास ठेवून ती स्वामिभक्त दाई त्याला ह्मणाली, 'ह्या आपल्या राजास संभाळा.' त्या राजपुत्राकडे पाहून त्याला जरी त्या बालकाची करुणा आली तरी त्या दाईची विनंति मान्य करण्यास तो कांकूं करूं लागला. इतक्यांत त्याची वृद्ध आई तेथें होती ती त्याची वानवा पाहून त्याला ह्मणाली, 'भिऊं नकोस. आपला इमानीपणा राखणें आहे तर, धोके व संकटें याची कल्पना मनांत

आणून धैर्य खचूं देऊं नकोस. हा तुझा धनी आहे, तो आपला राजा संगराणा याचा पुत्र आहे, त्याचा प्रतिपाळ कर. ईश्वरी कृपेनें सर्व गोष्टी यथास्थित होऊन यांत आपल्याला यश मिळेल.' तेव्हां त्याणें त्याला सांभाळण्याचें कबूल केलें. ह्या-प्रमाणें त्या स्वामिभक्त दाईनें आपला प्रिय यजमान व बालक यास वांचविण्याचा हेतु पूर्णतेस नेऊन ती मायाळू पन्ना कुमळमेर येथून चितोडास परत जावयास निघाली. ज्याच्याकरितां आपल्या पोटचा मुलगा बळी दिला त्या प्रिय राजपुत्रास ह्याप्रमाणें सोडून जातेवेळीं तिला किती दुःख झालें असेल हें सांगणें नकोच. परंतु तिला तेथें राहून परिणाम नीट व्हावयाचा नाहीं असें वाटलें. कारण, त्या मुलास असासाह याणें आपला भाचा असें ह्मटल्यामुळें, श्रावकाच्या मुलाजवळ रजपुतानी कशी राहिली असा लोकांना संशय येईल. ह्मणून ती ताबडतोब निष्ठुर मन करून चितोडास परतली.

पुढें असासाह याचे भाच्यासंबंधी लोकांमध्यें अनेक संशय निघूं लागले. आणि एकदां तर असासाह याच्या बापाचें सांवत्सरिक श्राद्ध होतें; त्या दिवशीं एका पंक्तीला आमंत्रित रजपूत बसले होते व दुसऱ्या पंक्तीला श्रावक वगैरे असासाह याचे जातीची मंडळी बसली होती. त्या वेळीं या उदयसिंगानें पंक्तींमधून दोघांनाही वाढण्यास फिरत जावें, परंतु त्याला रजपुतांपैकीं कोणी बोललें नाहीं. यावरून लोकांचा त्याजविषयींचा संशय दिवसेंदिवस दृढ होत चालला. कारण, तो जर खराच असासाह याचा भाचा असता, तर श्रावक लोकांच्या हातचें रजपूतांनीं खाल्लें नसतें. आणि उदयसिंग तर विनहरकत दोन्ही पंक्तींमधून फिरत होता. ह्याप्रमाणें उदयसिंग असासाह याचे घरीं सात वर्षें होता. ह्मणजे, आतां त्याचें वय सुमारें तेरा वर्षांचें झालें होतें. तों वरील गुप्त गोष्टी विशेष उघाडीस येऊं लागल्या. एके वेळीं सोनीगडचा ठाकूर कुमळमेरच्या सुभेदारास (असासाह यास) भेटावयास आला असतां उदयसिंग यास त्याला सामोरें पाठविलें. तेव्हां तें काम त्याणें इतक्या हुशारीनें केलें कीं, त्याच्या योगानें तर तो राजवंशीयच आहे अशी ठाकुराची खात्री झाली. ह्याप्रमाणें सर्व मेवाडांतील सरदारांस ही बातमी समजली इतकेंच नव्हे, तर शेजारच्या इतर ठाकुरांसही हें वृत्त समजून संगराण्याचा वंशज कायम आहे असें कळलें. नंतर ह्या गोष्टीची खात्री करून घेण्याकरितां साळुंब्राचा ठाकूर साहीदास, चोंडाचा वकील, केळव्याचा जगो, बगोरचा संग, सर्व चोंडावत ठाकूर, कोठारिया आणि बेडला येथील चव्हाण, बिजोलीचा प्रमार, सोनीगडचा अखिराज, सांचोराचा पृथ्वीराज आणि लोणकर्ण जेठावत वगैरे पुढारी मंडळी कुमळमेरास गेली व त्यांणीं पन्ना दाईकडून

प्रारंभापासूनची इत्थंभूत हकीकत ऐकिली. तेव्हां त्यांची खात्री झाली कीं, संग-राण्याचा जो मुलगा बनबीरानें मारला ह्मणून ह्मणतात तोच हा चितोडचा खरा वारस होय.

ह्याप्रमाणें आजपर्यंत राहिलेल्या गुप्त कृत्याची वेळेवर उघडकी झाल्यामुळें सर्व मंडळीची तेथेंच सभा भरली. तेव्हां त्या स्वामिनिष्ठ व प्रामाणिक सुभेदारानें (असासाह याणें) राजपुत्राच्या प्रतिपालनाचें काम, त्या मंडळींत बडा व वृद्ध असा कोठारियाचा चव्हाण आहे असें पाहून व त्यास पहिल्यापासून हा गुप्त व्यवहार सर्व माहित आहे असें जाणून, त्याचेकडे सोंपविलें, आणि उदयसिंगास त्याचे मांडीवर बसवून तो आपल्या कर्तव्यांतून आणि जबाबदारींतून मोकळा झाला. तेव्हां चव्हाणानेंही हा प्रसंग जाणून मोठ्या आनंदानें त्या मुलाचा सांभाळ करण्याचें पतकरिलें व सर्वांची खात्री व्हावी ह्मणून तेथेंच त्याणें राजपुत्र उदयसिंग यास आपल्या ताटात घेऊन त्याजबरोबर भोजन केलें. नंतर लागलीच सोनीगडच्या ठाकुरानें त्याला आपली मुलगी देऊन त्याचें लग्न केलें. हमीर यास पूर्वी सोनीगडच्या ठाकुरानें आपली गतभर्तृका कन्या कपटानें दिली होती तेव्हां हमीरानें, 'पुनः त्या घराण्याशीं बेटीव्यवहार ठेवावयाचा नाहीं' ह्मणून जो ठराव केला होता त्यावर आजपर्यंत त्या घराण्यांतील मुलगी चितोडच्या राण्याचे घरीं आली नव्हती. तो ठराव या वेळीं रद्द होऊन पुनः सोनीगड व चितोड यांचा वर लिहिल्याप्रमाणें अंगांगीभावसंबंध झाला. आणि पुढें लागलेंच कुंभो येथील किल्ल्यांत मेवाडचे सर्व ठाकूर जमून त्यांणीं तरुण उदयसिंगास 'चितोडचा राणा' असें ठरवून टिळा लाविला व रीतीप्रमाणें त्याला सर्वांनीं मुजरे केले.

बनबीराच्या कारकीर्दीत, सरदार लोकांस नावडत्या व पूर्वींच्या रीतीभातींस विरुद्ध अशा कांहीं वहिवाटी व चाली सुरू झाल्या. त्या संबंधानें चितोडचे दरबारी लोक फार कुरकुरत असत. त्यांत चोंडावत ठाकूर तर असा निर्भीड असे कीं, बनबीरानें एखादी नवीनच वहिवाट किंवा चाल सुरू करण्याचें ठरविलें ह्मणजे त्यास तो सर्वांशीं मोडा घाली व शेवटीं असेंही ह्मणे कीं, 'जीं सन्माननीय कामें बाप्पा रावळाच्या अस्सल वंशजांकडून झालीं तींच सितळसेनी बटकीच्या पोराकडून तिरस्कार करण्यासारखीं होतात !' ह्याप्रमाणें बनबीराविषयीं लौकरच सर्वांचें मन विटलें व एकदां सर्व लोक कुमळमेरास जमून त्यांणीं संगराण्याच्या औरस पुत्रास 'मेवाडचा राणा' ह्मणण्याचें ठरविलें. पुढें असा प्रसंग आला कीं, बनबीर यास आपणच चितोडाहून निघून जावें लागलें. तो प्रसंग हा:—सोनीगडच्या ठाकुरानें उदयसिंगाला आपली मुलगी दिल्याचें वर लिहिलेंच आहे. पुढें झालावाडच्या

रावानेंही आपली मुलगी देण्याचें योजून बल्ही येथें तो लग्नसमारंभ आटोपला. उदयसिंग हा आपला राणा असें सर्वत्र प्रसिद्ध झालें असल्यामुळें मेवाडच्या व इतर सर्व ठाकूर वगैरेंकडून या प्रसंगीं राणा उदयसिंग यास अहेर आले. परंतु त्यांत माहोलीचा सोळंखी व ठाण्याचा मालोजी या दोघां ठाकुरांकडून राण्याच्या सन्मानार्थ कांहींच भेट किंवा अहेर आला नाहीं. हा अपमान लोकांस सहन न होऊन त्या दोघांचें पारिपत्य करण्याकरितां उदयसिंगाच्या पक्षाचे सरदार आपलीं लष्करें घेऊन त्यांजवर निघाले. त्यांत त्यांणीं अशी मौज केली कीं, त्या दोघांवर हल्ला करावयाचा त्यांतच दासीपुत्र बनबीर याजवरही स्वारी करून त्याला ठोकण्याचा त्यांणीं बेत केला. या मोहिमेंत मालोजी मारला गेला व सोळंखी शरण आला. बनबीराचे पक्षाला तर कोणीच नव्हते. तो किल्ल्यांतून खालीं या बंडखोरांस शासन करण्याकरितां आला तों बंडखोरांनीं दुसऱ्या बाजूनें किल्ल्यावर चढून तेथील रखवालदारांस ठार केलें व तेथें आपल्या पक्षाचे नवे रखवालदार नेमून त्यांणीं उदयसिंगाची द्वाही फिरविली. सारांश, बनवीर जो चितोडाचे किल्ल्याबाहेर आला तो तसाच राहिला. त्याचा पुन: ह्मणून चितोडच्या किल्ल्यांत प्रवेश झाला नाहीं. ह्याप्रमाणें फारसा दंगा न होतां बनवीर दूर होऊन खरा वारस जो उदयसिंग तो चितोडचा राणा झाला. चितोडच्या सरदारांनीं बनबीराला आपलें सामानसुमान आणि कुटुंबांचीं माणसें काणसें वगैरे सर्व घेऊन जाण्याला सांगितलें. तेव्हां त्याणेंही कांहीं एक गडबड न करितां मुकाट्यानें तेथून आपलें बिऱ्हाड उचललें; आणि तो दक्षिणेकडे येऊन राहिला. नागपूरचे भोंसले हे बनबीराचेच वंशज आहेत असें ह्मणतात.

उदयसिंग—ज्यास उदेसिंग असेंच ह्मणत असत—हा वि० सं० १५९७ ह्मणजे इ० स० १५४१-२मध्यें गादीवर बसला. चितोडच्या सिंहासनावरून दासीपुत्र दूर झाला व खरा मालक मोठ्या चमत्कारिक रीतीनें वांचून पुन: चितोडच्या गादीवर आला, ह्या सर्व इतिहासभागावर अनेक गाणीं करून तीं गाणीं रजपूत बायका अद्यापि गात असतात. सारांश, हा प्रसंग सर्वांना अत्यानंददायक झाला. परंतु मेवाडचें दुर्दैव जें संगराण्याचे मृत्यूपासून डोकावीत होतें तें कांहीं अजून मागें झालें नव्हतें. संगाचे दोघे मुलगे—रत्नसिंग आणि विक्रमाजित—हे दुराचरणी व दुष्ट निघाल्यामुळें रजवाड्यांचे इतिहासांत त्यांचे संबंधानें फार वाईट लेख राहिला. त्यांच्या कारकीर्दीपासून मेवाडच्या राण्याचे वंशांत नामर्दपणा शिरत चालला व त्यामुळें सर्व लोकांमधील त्या वंशाचें वजन, आदर आणि अजिंक्यता हीं नाहींशीं होत चाललीं. चंद भाटानें आपल्या काव्यांतून असें ह्मटलें आहे कीं, "ज्या राज्यावर अज्ञान राजपुत्र आहेत आणि जेथें बायका कारभारी आहेत तेथें दुःखसंकटांचा अधिवास अ-

साधयाचाच." आणि त्याप्रमाणें तीं दोन्हींही साधनें जेथें एकसमयावच्छेदेंकरून प्राप्त आहेत तेथें तर त्या दुःखसंकटाला वाणच नसावयाची. मेवाडास या दोन्ही गोष्टी अनुकूल असल्यामुळें त्याला पुनः पूर्वीचे दिवस येऊन तें पूर्ववैभवान्वित होईल किंवा नाहीं याविषयीं लोक संशयांतच होते. उदेसिंग याजमध्यें राजपद भोगण्यासारखा एकही गुण नव्हता. त्याजमध्यें शौर्य तर बिलकुल नसून तो चितोडच्या गादीवर केवळ वारशानें आला होता असें पुढें लोकांस कळून आलें. असें होतें तथापि बलिष्ठ स्नेही व अभिमानी मित्र यांच्या साह्यानें त्याचें राज्य निर्वेधपणें चालण्यास हरकत नव्हती. परंतु दैव प्रतिकूल झालें ह्मणजे सर्व गोष्टी विपरीत होतात. चितोडच्या गादीचा मोठा अभिमानी व मित्र असा हुमायून बादशाह असून तो आपल्या सुरक्षतेंत असता ह्मणजे चितोडास चांगला पाठिंबा होता. परंतु त्याजवरही त्याच वेळीं संकटांवर संकटें येऊन तो सुरक्षित स्थळ बघत फिरत होता. सारांश, ज्या राष्ट्रानें एक वेळ कीर्तिपर्वताचे शिखरावर आरोहण करून वैभवसुखसमुद्रांत अवगाहन केलें तें राष्ट्र एकदां डबघईस आलें ह्मणजे पूर्वस्थितीला येण्याची मोठी मुष्कील पडते. रजपूत लोकांचें शौर्य आणि मराठ्यांचा दरारा पूर्वीसारखा रामेश्वराचे टोंकापासून नेपाळ-पेशावरापर्यंत गाजेल काय ? राजस्थानांतील चितोड किंवा महाराष्ट्रांतील पुणें हीं शहरें पुनः आपल्या पूर्ववैभवानीं युक्त होतील काय ? या प्रश्नांना इतिहास काय उत्तर देईल ?

ज्या वर्षी कुमळमेर येथील राजमंदिरांत उदेसिंगाबद्दलचा दरबार होऊन तो चितोडचा खरा वारस ह्मणून सरदार लोकांनीं मानिलें व आनंदोत्सव केला, त्याच वर्षी अमरकोट येथें एक दिव्य पुरुष जन्मास आला. ईश्वरी संकेतानें हाच भाग्यशाली पुरुष पुढें हिंदुस्थानचा सर्वमान्य बादशाह व्हावयाचा होता. हा पुरुष ह्मणजे पुढें फारच प्रसिद्धीस आलेला व सर्वांचा आवडता झालेला जो अकबर बादशाह, त्याचें वरील वर्षांत मोठ्या दुरवस्थेंत जन्म झालें. हुमायून गादीवर बसल्यापासून दहा वर्षेपर्यंत त्याचें व त्याच्या भावाचें सारखें भांडण चाललें होतें. हा भाऊ ह्मणजे त्याच्या हाताखालीं एक मांडलिक राजासारखा सुभेदार नेमिलेला होता. या आपसांतील भाऊबंदीच्या कलहाचा असा परिणाम झाला कीं, ते दोघेही अशक्त व असमर्थ होऊन त्यांच्या इष्टवैभवाचा लाभ तिसऱ्यालाच झाला. ह्मणजे, शिरशाह ह्मणून एक पठाण त्यांजवर येऊन त्याणें हुमायुनाचें राज्य घेतलें आणि हुमायुनास जीव व कुटुंब घेऊन पळून जावें लागलें.

वरील शिरशाहाशीं जी हुमायुनानें लढाई दिली ती कनोज येथें झाली व तेथें त्याचा पराभव होऊन राजपद गेलें. तरी शत्रु शिरशाह याणें त्याची पाठ सोडिली

नाहीं. त्याणें त्याचा पाठलाग करीत त्याला आग्र्यापासून लाहोरपर्यंत पिटाळीत लाविलें. नंतर हुमायून लाहोराहून पुनः आपलें कुटुंब वगैरे घेऊन हिंदुराजांकडून कांहीं साह्य मिळेल ह्मणून फिरत फिरत सिंधुनदीच्या थडीनें खालीं उतरला. त्या वेळीं तर त्याची फारच दुर्दशा होती. त्याला रोजच्या निर्वाहाची देखील पंचाईत पडूं लागली. परंतु त्याचा कांहीं उपाय नव्हता. ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें सर्व गोष्टी त्याला प्रतिकूळ होऊं लागल्या. जवळ खायाला मिळेना तेव्हां त्याचा आश्रय धरून असलेले लोकच त्याजवर उठून बंडावा करूं लागले; हें एक त्या अवस्थेंत त्याला मोठेंच संकट झालें. शेवटीं त्या सर्वांस त्याणें रजा देऊन आपण व बायको असा सडाच कोठें आश्रय मिळेल ह्मणून भटकत चालला. त्याणें जसलमीर आणि जोधपूर येथील ठाकुरांकडे आश्रय मागितला; परंतु व्यर्थ. त्याचप्रमाणें त्याला भाटी व राठोड यांजकडेही आश्रय मिळाला नाहीं. यांत कांहीं नवल नाहीं. परंतु त्यांपैकीं मालदेव ठाकूर याणें त्याला उलट पकडून कैद करून ठेवण्याचाही प्रयत्न केला होता. तेव्हां तो बिचारा, अशा मानवांपासून धोक्यांत पडण्यापेक्षां चकचकीत वनपशूंत राहून त्यांजपासून काय होईल तें बरें असा विचार करून, याजकडे त्याजकडे याच्आवृत्ति करीत हिंडण्याचें सोडून, तो चकचकीत रानावनांतून चालला. त्या वेळच्या त्याच्या दुःखांना पारावार नव्हता. या दुःखसंकटांनीं या दैवदुर्विलासी बादशाहाचें धैर्य आणि सद्गुण हे पुरे कसोटीला उतरले. बादशाही राज्याचा उपभोग भोगणाऱ्या राजपुरुषांवर जेव्हां असा कालचक्राचा फेरा येतो तेव्हां त्यांच्या दुरवस्थेकडे बघून आपल्याला तर करुणा उत्पन्न होते. आणि, अशा अवस्थांचीं चित्रें रेखण्यास प्रसिद्ध मुसलमान इतिहासलेखक फेरिस्ता याचा हात तर खंडाच होता. अस्तु. शेवटीं हुमायून अमरकोट येथील राजाचे आश्रयाला येऊन राहिला. हुमायून यास ज्योतिषशास्त्राची चांगली माहिती असल्यामुळें, त्याणें आपली पत्रिका बघून असें अनुमान करून ठेविलें होतें कीं, 'हीं जीं मजवर दुःखसंकटें येत आहेत हीं केवळ शरत्कालचीं अभ्रें असून त्यांच्या आंत परम सतेजस्क असा माझा पूर्ववैभवसुखादित्य आच्छादून राहिला आहे. तो केव्हां तरी या दुःखसंकटाभ्रांस वितळवून व आपला दिव्यप्रकाश पाडून मला वैभवकमलवनांत यथेच्छ रमवील.' अमरकोटास त्याला चांगला व विश्वसनीय आश्रय मिळाला होता. व तेथेंच त्याची गर्भपूर्णा स्त्री प्रसूत होऊन वर लिहिल्याप्रमाणें हिंदुस्थानाचा भावी चक्रवर्ती बादशाह जन्मास आला.

हुमायुनानें आपल्या पळापळींत फार लांबबरचा प्रवास केला होता व अनेक अनुभव बघितले होते. अकबराचा जन्म झाल्यावर कांहीं दिवसांनीं हुमायून पुनः

प्रवासास निघाला. तो काश्मीर, कंदाहार व इराण इतक्या लांबपर्यंत जाऊन आला. त्यानें, अकबर मोठा होत चालला तसा त्याजकडून विद्याभ्यास करवावा. खुद्द हुमायून ज्या पद्धतीनें विपत्काळीं आपला बाप बाबर याजजवळ अभ्यास करीत होता, त्याच पद्धतीनें तो आपल्या मुलाकडून ह्या विपत्काळीं अभ्यास करवी. हुमायुनानें आपल्या दैवाची परीक्षा वर सांगितलेल्या सर्व मोठमोठ्या ठिकाणीं प्रयत्न करून बघितली. परंतु ती कोठेंही उतरली नाहीं. ह्याप्रमाणें तो सुमारें बारा वर्षेंपर्यंत विपद्ग्रस्त होता. इतक्या काळांत हिंदुस्थानांत अनेक उलाढाली झाल्या. हुमायुनाचे राज्यावर तर शिरशाहापासून येथपर्यंत सहा पठाण राजे झाले. सहावा पठाण शिकंदर हा बादशाह होता तों हुमायून आपल्या दुष्प्रारब्धाचे दिवस काढीत काढीत फिरून काश्मीरास येऊन राहिला होता. त्यानें, शिरशाहाचे पश्चात् सर्व राज्याची अव्यवस्थाच असून हल्लीं पुढें चाल केली तर यश मिळेल असा लोकांचा अभिप्राय बघून, तो एकदम सिंधुनद ओलांडून सरहिंदवर चालून आला. तेव्हां शिकंदरही आपलें लष्कर घेऊन त्याशीं सामना करण्यास आला. परंतु या वेळीं अकबराच्या विलक्षण हुशारीनें, शौर्यानें आणि बातबेतानें शिकंदराचा सर्वांशीं मोड होऊन हुमायुनास जय मिळाला. या वेळीं अकबराचें वय केवळ बारा वर्षांचें असून त्याचा इतका पराक्रम आणि इतकें युद्धकौशल्य बघून सर्व लोकांस अचंबाच वाटला. ह्याप्रमाणें तो लहाना युवराज विजयी होऊन त्यानें आपल्या बापाचें राज्य फिरून मिळवून दिलें. युवराज अकबर याच्या भावी कीर्तिप्रसाराचें हें पूर्वदर्शन होय. येणेंप्रमाणें हुमायून विजयी होऊन आपल्या वीरपुत्रासह दिल्लींत शिरला व आपल्या तख्तावर बसला. परंतु हें, फार दिवस दुःखें, यातना, कष्ट व हाल सोसून पुनरपि मिळविलेलें आपलें राज्य, त्याचा भोगवटा घेण्यास तो फार दिवस वांचला नाहीं. त्याला मृत्यु फारच चमत्कारिक रीतीनें आणि तोही विशेष चमत्कारिक अवस्थेंत असतां प्राप्त झाला. तो आपल्या किताबखान्याचे गच्चीवर पुस्तकें वाचीत बसला असतां तेथून खालीं पडला आणि मेला! पूर्वदेशीय राजांमध्यें विद्येची अभिरुचि पहिल्यापासूनच कमी दृष्टोत्पत्तीस येते. आणि असली तरी दुसऱ्यांना आश्रय व उत्तेजन देण्यापुरतीच दिसेल. परंतु हुमायुनाची गोष्ट तशी नव्हती. तो जसा विद्येला उत्तेजन देण्यांत अग्रेसर होता तसाच तो स्वतः मोठा विद्वान् व पंडित होता. हें त्याला मोठें भूषण होतें. तो इतिहासलेखक, कवि, ज्योतिषी, योद्धा, कायदेबाज आणि धर्मनीतिज्ञ असल्यामुळें एकंदर पूर्वेकडील राजमालेंत चमकणारा हिरा होता. या सर्व गोष्टी लक्षांत आणिल्या, आणि त्या वेळीं त्याला समकालीन

१. इ० स० १५५४ या वर्षी.

असणारे युरोपांतले राजे पाहिले, तरी त्यांमध्यें हुमायुनाची विद्या, त्याची सुधारणा आणि इतर चांगल्या राजाचीं लक्षणें हीं विशेष होतीं असें आढळेल. त्या वेळीं इंग्लंडांत इलिजाबेथ राणी असून फ्रान्सांत चौथा हेनरी राजा राज्य करीत होता व त्यांच्या काळीं ते तिकडे फार नांवाजलेले आणि विद्याप्रिय राज्यकर्ते होऊन गेले. परंतु हुमायुनाशीं त्यांची बरोबरी पाहिली तर त्यांच्या गुणांचा ताजवा हलका भरेल असें परदेशीय इतिहासलेखकांचेंही ह्मणणें आहे. पूर्वदेशीय राजे व बादशाह यांस पुस्तकालय आणि किताबखाना माहीत देखील नसे, अशा राजमालेंत हुमायुनासारखा विद्वान् व रसिक बादशाह निपजला, हें त्या वेळच्या प्रजेचें सुदैवच ह्मटलें पाहिजे.

हुमायुनाचे मागून अकबर हा गादीवर बसला. त्या वेळीं सर्वांशीं पक्का बंदोबस्त झाला नव्हता; तो त्याच्या बापाचा बहिरामखान ह्मणून जो प्रधान होता त्यानें आपल्या शहाणपणानें आणि वजनानें उत्तम रीतीनें केला. त्यानें काल्पी, चंदेरी, कलिंजर, बुंदेलखंड व माळवा हे प्रांत काबीज करून अकबराचे राज्यास जोडिले. तोंपर्यंत अकबराचें अठरा वर्षांचें वय झालें. तेव्हां तो स्वतंत्रपणें राज्यकारभार पाहूं लागला. तो स्वतंत्र झाल्याबरोबर त्यानें रजपुतांवर स्वारी करण्याची तयारी केली. आणि ज्या मालदेव राठोडानें त्याच्या बापास पकडून कैदेंत टाकण्याचा विचार केला होता त्याचा सूड उगवावा ह्मणून तशीच राठोडावरही जाण्याची त्याणें सिद्धता केली. त्यांत त्यानें हेतूप्रमाणें राठोडाचा तर सूड उगविला व त्याचें मेरटिया ह्मणून जें मारवाडांत प्रसिद्ध शहर आहे तें घेतलें. या स्वारीमध्यें अंभेरचा (जयपूरचा) ठाकूर राजा भारमल्ल व त्याचा मुलगा भगवान्दास हे अकबराबरोबर झुंजण्यास आपण अशक्त असें समजून त्याला शरण गेले. इतकेंच नव्हे, तर भारमल्ल याणें आपली मुलगी अकबर बादशाहास देऊन तो त्याच्या पदरचा एक सरदार होऊन राहिला. त्यानंतर राजस्थानांत चितोड वगैरेंवर त्याला यावयाचें होतें. परंतु ज्यांचें त्यानें राज्य घेतलें होतें ते पहिले दिल्ली येथील मुसलमान लोक त्याजवर फिरून येऊन त्याच्या कबज्यांतून आपलें राज्य घेण्याची तयारी करीत होते. तेव्हां त्यांचा समाचार घेण्यास त्याला आणखी वेगळी व्यवस्था करावी लागली. यामुळें राजस्थानावरील त्याची स्वारी लांबणीवर पडली असती; परंतु त्यानें माळव्याचा बाझबहादूर व नरवारचा पदभ्रष्ट राजा यांची बंडखोर मुसलमानांवर योजना केल्यामुळें त्याला चितोडावर येण्यास सहज फुरसद झाली. (इ० स० १५६७.)

अकबरानें चितोडावर स्वारी केली खरी. परंतु अकबर आणि चितोडचा राणा उदेसिंग या परस्परांचे शौर्यादि गुण अगदींच भिन्न भिन्न होते. अकबराचें आणि उदेसिंगाचें या वेळीं ह्मटलें ह्मणजे वय कांहीं फार नव्हतें. दोघेही तिसीच्या आंतच

होते. परंतु त्यांत विशेष हा झाला कीं, "अकबराच्या जन्मकाळीं त्याला अनुकूळ ग्रह असावेत ते उदेसिंगाच्या जन्मकाळीं नसतील. असें असल्याशिवाय त्या उभय समवयस्क प्रतिस्पर्ध्यांमध्यें गुणशीलांचें इतकें अंतर पडलें नसतें," असें भाट लोक ह्मणतात. हें कांहींही असो. यांत भेद दिसण्यास प्रत्यक्ष कारण असें झालें कीं, अकबराला प्रथमपासून उत्कृष्ट मसलतगार आणि सद्गुणी प्रधान मिळाल्यामुळें व त्याचप्रमाणें तो लहानपणापासून बापाच्या उत्तम शिक्षेंत असून राजपुत्रास लागणाऱ्या अवश्य गुणांत प्रवीण झाल्यामुळें त्याचा पुढील काळ व त्यानें पुढें केलेलीं कार्यें हीं यशस्वी अशीं त्याच्या इतिहासांत लिहिण्यास सांपडलीं. असा प्रकार प्रथमपासून उदेसिंगाच्या संबंधानें असलेला दिसत नाहीं: तो गर्भस्थ असतांच त्याला नष्टपितृत्व आलें. पुढें अनेक संकटें येऊन मोठ्या शिताफीनें तो दासीकडून वांचून परजातीय श्रावकाचे आश्रयानें वाढला. नंतर राज्यावर आला. तेव्हां तरी त्याला प्रधान-व-मंत्रीमंडळी चांगली असायला पाहिजे होती. परंतु अकबराच्या प्रधान-व-मंत्रीमंडळाशीं तुळून पाहिली तर ती असावी तशी नव्हती असें दिसतें. अकबराचा प्रारंभीं प्रधान बहिरामखान हा असून त्याची तर त्या वेळीं फार ख्याति होती. तसाच पुढेंही त्याचा मंत्री प्रसिद्ध व सद्गुणी अबू फजिल हा होता. ह्याप्रमाणें अकबराला 'अधिकस्याधिकं फलम्' मिळालें यांत आश्चर्य नाहीं. तरी आह्मीं जें वर उदेसिंगाच्या पक्षानें लिहिलें आहे, त्यावर अभिमानी व शूर रजपूत असें ह्मणतील कीं, 'कांहीं जरी असलें आणि कोणत्या जरी प्रसंगांत उदेसिंग लहानपणापासून वाढला होता तरी, ज्या अर्थीं संगराण्याचा तो पुत्र असून पहिल्यापासून नांवाजलेल्या चितोडच्या रजपूतघराण्यांत उत्पन्न झाला होता, त्या अर्थीं त्यानें आपल्या पूर्वजांप्रमाणेंच शूर, धीर व गुणवान् निपजावयाचें होतें.' अस्तु. आतां आपण इतिहासाकडे वळूं.

अकबरानें चितोडावर हल्ला केला. परंतु त्यास नेटानें मागें हटविण्याचें उदेसिंगास सामर्थ्य नव्हतें. तेव्हां त्याची एक कुशल व धैर्यवान् राख होती तिनें मोंगल लोकांशीं नेट देऊन लढाई चालविली होती. या राखेचें उदेसिंगावर इतकें वर्चस्व असे कीं, उदेसिंगाची व त्यामुळें अर्थात् चितोडाचीही ती स्वामिनी झाली होती. पूर्वी आह्मीं एके ठिकाणीं चंद भाटाचें ह्मणणें दिलेंच आहे कीं, "अज्ञान राजा आणि स्त्री कारभारी अशा दोन गोष्टी जेथें असतील त्या राजाची धूळधाणच व्हावयाची." त्या दोन्ही गोष्टी प्रस्तुत चितोडाचे वांट्यास आल्या होत्या; हें वरील सर्व हकीकतीवरून समजेलच. व त्यावरून चितोडाचे बाजूला अपयश होतें यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

हिंदुस्थानांत मोंगलपदबादशाही अशी अकबरानें स्थापिली. त्यापूर्वीं मोंगली का-

रकीर्दीस इतकी बळकटी आली नव्हती. तो शहाण्या बापाचा शहाणा मुलगा शोभत होता. तो गुणवान्, दुसऱ्याच्या मनाची परीक्षा करणारा व प्रसंग पाहून वागणारा, असा होता. शौर्याविषयीं तर त्याचीं कृत्येंच साक्ष देत आहेत. तरी, शूरांकडून लढाईमध्यें व पुढें यशोभरांत कांहीं अनन्वित व निर्दयपणाचीं कृत्यें होतात; त्याप्रमाणें अकबराकडूनही अनन्वित व निर्दयपणाचीं प्रथम प्रथम बहुत कृत्यें झालीं. पण पुढें जसजसा तो पोक्तबुद्धीचा आणि विचारी होत चालला तसतसें त्याचें आचरण फारच लोकप्रिय होत जाऊन शेवटीं शेवटीं तर लोक त्यास 'जगद्गुरु' असेंही ह्मणूं लागले. परंतु त्यानें प्रथमतः जीं निर्दयपणाचीं व अनन्वित कृत्यें केलीं तीं त्यास शहाबुद्दीन गोरी व अल्लाउद्दीन वगैरेंच्या पंक्तींत सहज आणून बसवितील इतकीं निंद्य होतीं. त्याचा खुलासा पुढें येईलच. तरी, शेवटीं त्यानें लोकांकडून बरें ह्मणवून घेतलें हें त्याच्या गुणशीलास योग्य होतें.

मेवाडच्या राण्यांत तर राज्यकर्तृत्वाचे गुणांचा अभाव होता व त्यामुळें मेवाडावर आकाबाईचा फेरा येण्याचीं दुश्चिन्हें उघड उघड दिसत होतीं. चितोडच्या रणावर आजपर्यंत दोन मोठमोठे प्रसंग होऊन जाऊन त्यामुळें रणदेवता तृप्त झाली असेल असें वाटत होतें. परंतु तसें नव्हे. ती रणदेवता अतिशय खादाड व बुभुक्षित होऊन आणखी आ पसरून पूर्वीप्रमाणेंच सहस्रावधि बळी मटकावण्यास बसली होती. 'उदेसिंगाच्या पलायनाबरोबरच चितोडांतील शोभा व कीर्ति या दोन्ही वधू विधवा झाल्या' असें लोक ह्मणूं लागले. चितोडावर अकबरानें एकंदर काय ते दोनच वेळां हल्ले केले. त्यांत पहिल्या स्वारीशीं उदेसिंगाची राखच लढत होती. परंतु ती पुढें त्याच्याच सरदारांकडून मारली गेली. कारण, राणा स्वतः दुर्बल होता तर त्यानें, सरदारांस पुढें होण्यास सांगावयाचें होतें. परंतु तसें त्यानें मुळींच न करितां एकदम त्या राखेलाच आपल्या वतीचें मुखत्यार करून 'तिच्या सांगितल्याप्रमाणें सर्वांनीं चालावें' ह्मणून हुकूम फिरविला. हा आपल्याला मोठा कमीपणा आहे असें सरदारांस वाटून, त्यांनींच त्या बाईला मारून टाकिलें. अकबराला निर्भयतेनें चितोडावर येण्यास इतरही अनेक अंतस्थ कारणें झालीं. अकबराचें या वेळीं पंचविशीजवळ वय असून चितोडासारखीं शहरें काबीज करून कीर्ति मिळविण्याची त्याला अत्यंत उत्सुकता होती. आणि या उत्सुकतेप्रमाणें त्याची तयारीही तशीच होती. पांडौलीपासून बसीपर्यंत, ह्मणजे सुमारें पांच कोसपर्यंत अकबराचें लष्कर पसरलें होतें. यामध्यें अकबराचा तंबू जेथें होता तेथें एक संगमरवरी स्तंभ उभा

१. ह्याच नावाचीं दोन गावें आहेत. पैकीं हे गांव मानसरोवर ह्मणून एका तळ्याच्या कांठीं वसलेलें आहे.

२. हा स्तंभ आपल्या इकडील दीपमाळेसारखा उंच असून वर चिंचोळा होत गेला आहे. हा सु-

केला असून त्यास 'अकबरका दिवा' असें ह्मणतात. अकबरानें येऊन तळ बान दिला, तों उदेसिंग पळून गेला. परंतु त्याच्या बरोबरच चितोडचें सर्व शौर्य व वीर्य गेलें नाहीं. जे लढाऊ व पराक्रमी सरदार होते त्यांनीं चितोडासाठीं लढून प्राण देण्याचा निश्चय केला. चितोडच्या सूर्यद्रवाज्यावर साळुंब्याच्या चोंडाचा अधिपति साहिदास होता त्यानें शत्रूला लढाई दिली. याचप्रमाणें बेडला आणि कोठारिया येथील ठाकूर, दिल्लीच्या पृथ्वीराजाचे वंशज–बिजौलीचा प्रमार व सादीचा झाला हे–दोघे सरदार, झालावाडचा राव, ईसरीदास राठोड, देवळा येथील दुसरा राजपुत्र, करमचंद कच्छवाह, दुदा सदानी, आणि ग्वाल्हेरचे तुवर असे खुद्द चितोडचे व बाहेरचे सर्व सरदार मोठ्या शौर्यानें आणि आस्थेनें चितोडच्या संरक्षणाकरितां लढले. याशिवाय खुद्द अकबरानें जो या लढाईचा इतिहास लिहिला आहे त्यांत बेदनूरचा जयमल्ल आणि केळव्याचा पट्टा हीं दोन नांवें जास्त सांपडतात. हे दोघेही त्या वेळीं मोठे शूर ह्मणून गाजलेले असत. जयमल्ल याचे बरोबर तर कितीएक सरदारांच्या बायकाही तरवारी घेऊन लढावयास आल्या होत्या, असें अकबरानें लिहिलें आहे.

सूर्यदरवाज्यावरील साहिदास चोंडा पडल्यावर तो दरवाजा केळव्याचा पट्टा याजकडे येऊन तो त्याचे संरक्षणार्थ लढत होता. या पट्टयाचें वय केवळ सोळा वर्षांचें असून त्याचा बाप नुक्ताच पडल्यामुळें त्यानें निराश होऊं नये ह्मणून त्याची आई त्याला उत्तेजन देण्याकरितां पुढें आली. ती ह्मणाली, 'बाळा, चिंता नाहीं. चितोडाचे बचावाकरितां आपला निर्वंश झाला तरी चिंता नाहीं.' ती इतकेंच ह्मणून थांबली नाहीं. तिनें आपल्या सुनेसही बरोबर घेऊन दोघीही हातांत तरवारी घेऊन आपल्या सैन्यास उत्तेजन देत होत्या. रजपूत लोकांच्या अभिमानाची आणि शौर्याची हीच कमाल आहे कीं, तरण्या तरण्या सुना, लेंकी, व वृद्ध आया सुद्धां समरांत निर्भयपणें येऊन शत्रूंशीं सामना करीत व यामुळें रजपूत सरदारांस विशेषच आवेश येऊन ते जीवाची पर्वा न करितां लढत असत.

इतक्यांत जयमल्लाला तोफेचा गोळा लागून तो खालीं पडला. त्याला चितोडाचें संरक्षण होऊन रजपुतांस जय मिळेल अशी बिलकुल आशा वाटेना. तेव्हां त्यानें 'जोहार' करण्याची आपली इच्छा दाखविली. त्याबरोबर आठहजार रजपुतांनीं त्या सतीच्या वाणाचे विडे उचलून आपले केशरी पोषाख चढविले आणि चितोडचे दरवाजे मोकळे टाकून ते सर्व शत्रूच्या फौजेवर जाऊन पडले आणि समरदेवतेला

---

मारें १५ हात उंच असून त्याचा पायथा ६ हात औरस चौरस व माथा २ हात औरस चौरस आहे. याजमध्यें पलिते वगैरे टाकून दिवा लावीत असत.

अर्पण झाले. तेव्हां अकबराला चितोड मोकळेंच सांपडलें. नंतर त्यानें आंत शिरून जो अनर्थ उडविला तो, त्याच्या पुढें मिळालेल्या 'जगद्गुरु' या नांवास अत्यंत लाजिरवाणा होता. त्यानें चितोडांत शिरल्याबरोबर तेथील स्त्रीपुरुषांची सारखी कत्तल चालविली. ह्याप्रमाणें तीसहजार रहिवासी लोक या कत्तलींत त्याच्या महत्वाकांक्षीय क्षुच्छमनार्थ त्याचे भक्ष्य झाले! इतकेंच नव्हे, तर त्यानें तीच तरवार राण्याचे एकंदर कुळावरही चालवून त्यांत नऊ राण्या, पांच मुली, दोन लहान मुलें, सरदारांच्या बायका, आणि राण्याचे आप्तसंबंधी व जवळच्या नात्यागोत्याचे असे सत्राशें लोक ठार केले! हा दिवस ह्मणजे चैत्र शुद्ध एकादशी रविवार, वि० सं० १६२४, ह्मणजे—मे, इ० स० १५६८, हा होता. ह्याप्रमाणें हिंसक पशुवृत्तीचें काम करून नंतर त्यानें धर्माभिमानानें हिंदूंचीं देवळें, मंदिरें, राजवाडे वगैरे दरोबस्त जमीनदोस्त करून आपल्या बादशाहीची पुरी खूण राखण्याकरितां त्या त्या ठिकाणीं मशिदी वगैरे बांधिल्या. चितोड येथील नगरदेवीच्या देवळाचीही वरच्याप्रमाणेंच स्थिति होऊन तेथील नगारे, दिवे, नौबदी, देवीचे दागिने, देवळाचे दरवाजे, वगैरे सर्व आग्र्यास रवाना केलें[1]. ह्याप्रमाणें चितोड येथील ही तिसरी गर्दी झाली.

अकबर याची वरील जयमल्ल व पत्ता या दोघां शूर रजपूत सरदारांविषयीं फार पूज्य बुद्धि होती व त्यांस तो फार मानीत असे. त्यानें ते आपल्या गोळ्यांनीं मेले ह्मणून त्या दोघांचे दोन पुतळे करवून ते दिल्ली येथील आपल्या राजवाड्यांत ठेविले आहेत. ते अद्यापि तेथें आहेत असें सांगतात. जयमल्ल याच्या शौर्याविषयीं व अकबर हा त्यास फार मानीत असे, याविषयीं अकबराचा प्रियमंत्री अबू फजिल आणि त्याचा पुत्र जहानगीर यांनींही आपल्या ग्रंथांत लिहून ठेविलें आहे. अकबरानें आपल्या या प्रिय शत्रूला 'संग्राम' असें नांव दिलें होतें. व ज्या तोफेच्या गोळ्यानें त्याचा अंत झाला तिलाही त्याणें तेंच नांव दिलें होतें. त्यानें सर्व मरून पडलेल्या रजपूत वीरांचीं जानवीं वजन करून पाहिलीं, तों तीं ७४॥ मण [कच्चा,—

---

१. अकबराच्या इतिहासांत त्याच्या सद्गुणांची मोठी तारीफ केलेली आढळते. परंतु वरील कृत्यें अमानुषतेचीं दिसतात. जो कलाकौशल्याची व सद्गुणसद्वर्तन यांची वृद्धि करण्याविषयीं अभिमानी असा प्रसिद्ध आहे, त्याचीं पूर्वकृत्यें इतकीं नीचपणाचीं व घातुक होतीं हें ऐकून त्याच्याविषयीं वाचकांस काय वाटेल? जगावर सत्कीर्तिमान् ह्मणून जे लोक नांवाजले जातात त्यांचीं पूर्वकृत्यें अशीं असतात काय? अल्लाउद्दीनासारखे क्रूरकर्मे, स्त्रैण व विषयी अशा मुसलमानलोकांकडून जीं नीच कृत्यें झालीं नाहींत तीं अकबरानें केलीं, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. अल्लानें चितोड घेतलें ह्मणून त्यानें वरच्याप्रमाणें घरादारांचा संहार केला नाहीं व त्याचप्रमाणें पूर्वीच्या कोणत्याही मुसलमानी शत्रूनें रजपुतांच्या संबंधानें इतका दुष्टावा दाखविला नाहीं. अस्तु. वरील सामानांतल्या कांहीं जिनसा अजमीरच्या पीराचे रोज्यांत अद्यापि असलेल्या आह्मीं पाहिल्या आहेत.

४ शेर =१ मण] भरली. हिंदुस्थानांतील सर्व हुंडीवाले व सराफ आपल्या वह्यां-वर व पत्रांवर अजून ७४।। चा अंक घालीत असतात. त्याचें कारण इतकेंच कीं, कोणी अक्षर बदलील किंवा पत्र फोडील तर त्यास वरील वजनाइतकीं जानवीं घालणाऱ्या लोकांच्या वधाचें पाप लागेल, अशी त्यांची शपथ आहे असें समजावें. या खुणेस ते 'चितोडमाऱ्याको पाप' असें ह्मणतात.

उदेसिंग जो चितोड सोडून पळाला तो राजपिंपळ्याचे गोहिल राजाकडे गेला व तेथून त्याचा पूर्वज बाप्पा रावळ चितोड जिंकण्यापूर्वी ज्या अरवली डोंगराच्या खोऱ्यांतील गिरवो नांवाच्या ठिकाणीं आश्रय करून राहिला होता, तेथें जाऊन राहिला. उदेसिंगाला हे दिवस येण्यापूर्वी बहुत वर्षे अगोदर त्यानें या ठिकाणीं उ-देसागर नांवाचा एक तलाव बांधिला होता, त्याचे कांठींच आणखी त्याच्या लोकांनीं घरें बांधून तेथें वस्ती केली आणि पुढें लौकरच त्यानें त्या शहरास 'उदेपूर'[१] असें नांव दिलें. उदेसिंग चितोडाहून पळून गेल्यावर चार वर्षांनींच तो गोगुंडा नांवाच्या गांवीं फाल्गुन शुद्ध पौर्णिमेचे दिवशीं मेला. त्या वेळीं त्याचें वय ४२ वर्षांचें होतें. त्याच्या संबंधाचा मानसन्मान वगैरे सर्व त्याच्या पलायनाबरोबरच लोकांच्या मनांतून पळून गेला होता. त्याला पंचवीस औरस मुलगे होते. उदेसिंगाचे वंशास 'राणा-वत,' 'बाबा,' 'पुरावत' किंवा 'कणावत' असेंही ह्मणतात. त्याचे मागून त्यानें जगमल्ल यास उदेपूरच्या गादीवर बसवावें ह्मणून सांगून ठेविलें होतें. त्याप्रमाणें तो गादीवर बसला. रजपुतांमध्यें राजा किंवा तद्वंशीय कोणी मेला असतां त्याचे कुटुंबांत सुतक वगैरे कांहीं न धरितां राजवाड्यांत राज्याभिषेकाची गर्दी चालली असते. त्याप्रमाणें उदेसिंगाचें शव स्मशानांत येऊन त्याचें दहन चाललें असतां वाड्यांत जगमल्लाला राज्याभिषेक कर-ण्याचा समारंभ चालला होता. परंतु, उदेसिंगानें जेव्हां सोनीगडच्या राजकन्येशीं लग्न लाविलें तेव्हां तिच्या भावाच्या (झालावाडचा राव याच्या) इच्छेवरून, 'इच्या पोटीं होणाऱ्या मुलास मी आपला वारस करीन' असें त्यानें वचन दिलें होतें. परंतु मरतेवेळीं त्यानें जगमल्लाबद्दलच सांगून ठेविलें व त्याप्रमाणें जगमल्ल गादीवर ब-सला; तेव्हां सोनीगडवाल्या राणीचा मुलगा प्रतापसिंग हा निराश झाला व तो आपल्या घोड्यावर बसून आतां बाहेर जावें अशा बेतांत होता तों, कृष्ण रावत व ग्वाल्हेरचा पदभ्रष्ट राजा, जे उदेसिंगाचे मंत्री व सरदार होते ते, आंत येऊन त्यांनीं जगमल्ल यास त्याचे बापाच्या अभिवचनाची हकीकत सांगून त्याला गादीव-रून बाजूला सरण्याविषयीं हळूच कळविलें. त्यावरून त्यानेंही त्यांच्या सांगण्याचा अपमान

१. सार्थ नांव—'उदयपूर' ह्मणजे, पूर्वेकडील किंवा सूर्य उगवतो तिकडील शहर.

२. 'राजस्थानचा इतिहास' पृष्ठ ५० पहा.

न करितां आपण बाजूला सरून आपल्या भावाला गादीवर बसविलें व प्रतापसिंग हा मेवाडचा राणा असें सर्व लोकांत जाहीर केलें. नंतर तो समारंभ आटोपून ते सर्व शिकारीला गेले. त्यांत त्यांस फार चांगली शिकार मिळून भावी सुदिनप्राप्तीचा त्यांना शकुन वाटला; व प्रतापसिंगाच्या राज्यकारभारानें मेवाडास पूर्ववैभव प्राप्त होईल अशी त्यांना आशा वाटूं लागली.

---

## भाग नववा.

## प्रतापसिंग.

प्रतापसिंगाचें राज्यारोहण आणि त्याचा पुढील उद्योग.—प्रतापसिंगाचा कृतनिश्चय.—त्याची धीरगंभीरता.—त्याला कित्येक साह्यकर्ते मिळतात.—प्रतापाची उदासीनता आणि विलाससुखत्याग.—त्याच्या वेळच्या साह्यकारांची उदासीनता—त्याची लढाईची सिद्धता.—त्याची लढाईचे पूर्वीची व्यवस्था.—अकबराची तयारी व त्याला रजपुतांची मदत.—बेटीव्यवहाराविषयीं इतर रजपुतांचें राण्याशीं बोलणें.—मुसलमानांशीं संबंध ठेवणाऱ्या रजपुतांशीं सिसोदियांचें वर्तन.—मानसिंग व त्याचा अपमान.—मानसिंगाच्या अपमानाचा सूड घेण्याची तयारी.—प्रतापसिंगाची युद्धार्थ सिद्धता.—त्याचें व सेलिमाचें युद्ध.—प्रतापसिंगाचें पलायन व त्याजवरील संकटें.—त्याच्या भावाचें त्याला साह्य व त्याचे 'चित्तक' घोड्याचा मृत्यु.—सूक्त प्रतापाला येऊन मिळतो.—हळदीघांटची कत्तल.—कुमळमेरची लढाई व त्यांत प्रतापसिंगाचा पराजय.—प्रतापसिंगाची दुर्दशा.—तो अकबराजवळ फुरसद मागतो.—त्याचा आवेश पृथ्वीराज पुन: चेतवितो.—पृथ्वीराजाकडील प्रतापसिंगाला पत्र.—प्रतापाचे विचार फिरून त्यास उत्तेजन येतें.—'नौरोजा' नांवाच्या उरूसासंबंधी माहिती.—प्रतापसिंगाची तयारी आणि त्याचा पुनर्विजय.—तो उदेपूर वगैरे काबीज करून आपलें पूर्ववैभव मिळवितो.—चितोड घेण्याची त्याची इच्छा.—त्याचा आजारीपणा व मरणकाळची चिंता.—प्रतापसिंगाचा मृत्यु.

प्रतापसिंग उदेपुरच्या गादीवर बसला व त्या गादीचा त्याजकडे सर्वांशीं हक्क होता. त्याचें कुळ ह्मणजे मेवाडांत सुप्रसिद्ध होतें; त्यामुळें त्या कुळाचें वैभव व सामर्थ्य यथापूर्व कायम राहून त्याजकडून मेवाडचें सौभाग्य रक्षण व्हावें असें सर्व इच्छीत होते. पण काल अनुकूल असल्याशिवाय कोणतीही सिद्धि किंवा यश मिळत नाहीं हा सर्वत्र अनुभव आहे. प्रतापसिंग गादीवर बसला खरा. परंतु त्याच्या खजिन्यांत द्रव्य मुळींच नव्हतें व तें कसें मिळवावें यालाही कांहीं युक्ति नव्हती. कारण, त्याच्या पूर्वजांनीं द्रव्योत्पत्तीचीं साधनें व जागा सर्व गमावून या स्थितीस राजकुल आणून सोडिलें होतें. अशी जरी स्थिति होती तरी प्रतापसिंगाची उमेद, आशा आणि इभ्रत फार मोठी होती. तो ज्या कीर्तिमान् कुळांत जन्मला होता त्या कुळाच्या नांवालौकिकाप्रमाणेंच तो गुणशीलानें युक्त होता. त्यानें प्रथमत:, चितोड स्वाधीन करून आपलें

गेलेलें नांव व यश पुनः मिळवावयाचें ह्मणजे आपल्याला पुढील विशेष कृत्यें करण्याचेंही सामर्थ्य येईल, असा विचार केला. आणि त्याप्रमाणें बेत ठरवून त्यानें तावडतोब चितोडावरील स्वारीची तयारी केली. परंतु या उतावळीमध्यें त्याणें आपल्या शत्रूंचें बळ व सामर्थ्य यांचा कांहीं एक अजमास बघितला नाहीं व ही स्वारी करण्यांत आपल्याला प्रतिकूळ काय काय गोष्टी आहेत हेंही पाहिलें नाहीं. प्रतापसिंगाला आपल्या पूर्वजांच्या बखरी व इतिहास वाचण्याची फार गोडी असून त्यांत त्यांच्या नानापराक्रमांचीं कृत्यें तो हमेषा वाचीत असे, व त्याचप्रमाणें पूर्वजांचे गुणानुवाद आणि पराक्रमशालिल भाटांच्या मुखांनीं त्याच्या कानांवर नेहमीं पडत असल्यामुळें, त्यानें जेव्हां वरील चितोडच्या स्वारीचा बेत केला तेव्हां तर त्याची अशी खात्री झाली कीं, हल्लींच्या प्रसंगीं मला या स्वारींत खास यशप्राप्ति होईल. तो ह्मणाला, 'आजपर्यंत दैव प्रतिकूल होतें; परंतु आतां आपण जर श्रम केले तर तें अनुकूल होणार नाहीं ह्मणून कशावरून ?' प्रतापसिंगाचा हा विचार कांहीं वावगा नव्हता. श्रमांवांचून प्रारब्ध पंगू आहे ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. परंतु नुस्त्या श्रमांनीं तरी काय होणार आहे ? त्या श्रमांना बाहेरच्या उपांगांची सिद्धता पाहिजे. त्या उपांगांची जेव्हां सिद्धता नाहीं असें त्यास कळलें तेव्हां त्याचें हृदय दुःखपूरित होऊन त्याला मनस्वी क्लेश झाले. त्याला ही मोठी आशा होती कीं, मी मेवाडचें पूर्वस्वातंत्र्य त्यास पुनः मिळवून देईन. परंतु त्याची ती आशा, ती महत्वाकांक्षा आणि ते बेत पुढें सर्व फसून त्यांत तो स्वतः फशीं पडल्यासारखा झाला. आजपर्यंत या राजकुलांशीं ज्या ठाकुरांचा स्नेहसंबंध असून ज्यांजकडून वखतावर यथाशक्ति साह्य मिळत असे ते मारवाड, अंभेर, बिकानीर, आणि बुंदी येथील सुद्धां सर्व राजे फितून त्याचा शत्रु जो अकबर त्यास मिळाले. आणि मोंगलांचा तर हा दस्तुर होता कीं, दुस्मानाकडील जे मदतगार असतील त्यांजमध्यें फूट पाडली ह्मणजे काम झालें. त्याप्रमाणें, त्यांनीं अगोदरपासूनच वरील राजांस आपलेकडे वळवून ठेविलें होतें. प्रतापसिंगाला हें कपटजाल कांहींएक माहित नव्हतें. त्याला सर्वप्रकारें असा भरंवसा होता कीं, आपण बेत ठरवून गोष्ट काढल्याबरोबर आपल्या पूर्वापर साह्यकर्त्या राजांची कुमक मिळेलच. पण त्या भरंवशाप्रमाणें त्याला कांहींच अनुभव आला नाहीं; इतकेंच नाहीं. तर त्याचा खुद्द सागरजी ह्मणून एक भाऊ होता तो देखील या वेळीं फितूर होऊन प्रतिपक्षाकडे मिळाला. या फितुरीमुळें सागरजी याला मोंगलांनीं चितोडच्या गादीवर बसविलें व त्याच्या पूर्वजांचें 'राणा' हें नांव त्याजकडे कायम केलें.

---

१. सागरजी याजकडे कंदाहार प्रांतही होता. तेथें जो त्याचा वंश वाढला त्यांतील पुरुषांस 'सागरावत' असें ह्मणत असून त्यांजकडे तो प्रांत, अंभेरचा सवाई जयसिंग यानें घेईपर्यंत, होता.

इतक्या गोष्टी झाल्या तरी प्रतापसिंग हा बिलकुल डगला नाहीं. त्याचा चितोड काबीज करण्याचा बेत फसल्यामुळें तर त्याची दुःस्थिति व तज्जन्य दुःखें जास्त दुणावलीं. तरी त्यानें सुमारें पंचवीस वर्षेंपर्यंत याप्रमाणेंच असहाय व निराधार असें एकटें राहून मोंगलाशीं वांकून दिवस काढिले. इतक्या दिवसांत त्याला नानाप्रकारचीं संकटें व हाल भोगावे लागले. कधीं कधीं तो उघड मैदानांत शत्रूंशीं सामना करून त्यांत त्यांचा नाश करी, व कधीं कधीं त्यालाच डोंगरांतून व आडरानांतून वनफळांवर निर्वाह करीत जीव व कुटुंब घेउन लपत फिरावें लागे. या पळण्यामध्यें त्याचा पुत्र उमराव, जो पुढें त्याच्या सर्व वैभवाचा मालक आणि शत्रूंचा सूड उगविणारा कुलदीपक झाला तो, लहान बालक असून त्याला घेऊन, क्रूर व हिंस्र वनपशूंच्या वसतिस्थानांतून व त्यांच्याच तोडीचे भिल्ल वगैरे रानटी लोकांच्या जंगलांतून प्रतापराण्याला फिरावें लागे. अकबर त्याला ह्मणे, 'तूं मला शरण ये ह्मणजे मी तुला तुझें राज्य वगैरे सर्व परत देतों.' परंतु त्याचा हा अभिमान फारच जाज्वल असे कीं, 'मी बाप्पा रावळाचा वंशज असून शत्रूला शरण जाऊन त्याजपुढें मान वांकवूं आणि माझ्या परम अभिमानशाली रजपूतकुळास बाटवूं, ही गोष्ट तर कालत्रयीं होणार नाहीं.' या वेळीं मोंगलांनीं मोठमोठे प्रांत व संस्थानें देऊन, त्या लोभानें पुष्कळ रजपूत राजांच्या मुली आपल्या वंशांत केल्या. व त्याचप्रमाणें प्रतापराण्याच्या सिसोदिया वंशालाही मोठे राज्य देऊन मिंधें करण्याचा मोंगल बादशाहाचा प्रयत्न चालला होता. परंतु प्रतापसिंगानें तशा प्रकारचें नीच कृत्य करून ऐश्वर्यसुख भोगणें रौरववासापेक्षांही अतिशय निंद्य मानिलें होतें.

मनुष्याची परीक्षा संकटकालींच होते. यातना, हाल, कष्ट व विपत्ति भोगूनही जो प्रतापसिंग धैर्य व उमेद न सोडतां सागरासारखा गंभीर आणि पर्वतासारखा स्थिर राहिला, त्याचा लौकिक त्या काळीं मेवाडांतील प्रत्येक पर्वतगुहेंत व थडींत जणूं काय प्रतिध्वनि करीत होता. त्याची धीरगंभीरता प्रत्येक रजपुताच्या अंतःकरणांत प्रतिबिंबित होऊन, त्यांचें त्यांनाच असें वाटूं लागावें कीं, अशा संकटग्रस्त व दुःखभाक् राजाला आपण साह्य करावें. त्याप्रमाणें कोणी लहान लहान राजे

---

सवाई जयसिंग हा मोंगलांचे ताब्यांतील एका प्रांताचा सुभेदार होता. व त्याच्या कुटुंबांतील मनुष्यांशीं सागरावतवंशीय लोक विवाहसंबंध करण्यास नाखुष असल्यामुळें सवाई जयसिंगास राग येऊन त्यानें त्यांस कंदाहार येथून हुसकून लाविलें. जहानगीर बादशाहाचा मोठा पराक्रमी व लढवय्या सरदार जो मोहबतखान तो वरील सागरावतांपैकींच एक असून त्याने हिंदुधर्म टाकून मुसलमानी धर्म स्वीकारिला होता. या सागरावतांनीं मध्यहिंदुस्थानांत उमरीभदोरा, गणेशगंज, दिगडोळी वगैरे लहान संस्थानें स्थापिलीं होतीं. हीं संस्थानें इंग्रजांपेक्षां शिंद्याच्या सरदारांस विशेष माहित होतीं.

त्याला यथासामर्थ्यें साह्य करीत. प्रतापाचें अलौकिक धैर्य आणि त्याचा स्वकुलाविषयीं अद्वितीय अभिमान यांच्या वर्णनाचीं गीतें मेवाडप्रांतांत सर्व राजकुळांतून गातात व तीं गातांना त्याच्या धैर्याभिमानाचें त्यांस स्मरण होऊन सद्गदितपणें ते अश्रुपात करितात !

प्रतापराण्याला अशा दुःखसंकटकाळीं ज्यांनीं साह्य केलें त्यांजवर प्रतापाच्या पूर्वजांचे उपकार होते. आलीकडे या राणेवंशाला अपयश आणि दारिद्य यांणीं घेरिल्यामुळें या साह्यकर्त्यांनीं आपला इमानीपणा राखिला हें त्यांस मोठें भूषण होय. राणा गतवैभव व दरिद्री झाला म्हणून त्याला सोडून त्याजविषयीं ते निरभिमान झाले नाहींत हा त्यांचा थोरपणा प्रशंसनीय होय यांत संशय नाहीं. प्रतापराण्याचा सावत्र भाऊ जयमल्ल याचे मुलगे आपल्या चुलत्याला साह्य करण्याकरितां आपला रक्तपात करण्याला देखील सिद्ध होते. त्याचप्रमाणें सालुंब्रा येथील चोंडावंशीय पट्टाराजाचे मुलगेही आपली स्वामीभक्ति आणि इमानीपणा जागविण्यास पुढें झाले होते. यामुळें आणि प्रतापाच्या प्रतापशाली वर्तनामुळें वर लिहिल्याप्रमाणें देलवाडा वगैरे ठिकाणचे आणखी कित्येक लहान लहान ठाकूर व राजे त्याच्याबरोबर समरांगणीं पडण्याकरितां आपखुषीनें व अनाहूत येऊन प्रतापसिंगाला मिळाले. या साह्यकर्त्यामध्यें देलवाडचा ठाकूर तर आपला उजवा हात आहे असें प्रतापराणा ह्मणत असे.

चितोडच्या राज्यासनावरून उदेपूरचे राणे पदभ्रष्ट झाल्यापासून चितोड नगरीला वैधव्य आलें होतें असें त्या वेळच्या भाटांनीं ह्मटलें आहे. हें वैधव्य घालवून त्या नगरीचें स्वामित्व आपले वंशाकडे आणण्याचा प्रतापसिंगाचा निश्चय झाला होता व तो निश्चय शेवटास जाईपर्यंत कोणत्याही प्रकारचें विलाससुख भोगावयाचें नाहीं असा त्यानें पण केला होता. त्यानें सोन्यारुप्याचीं ताटें वाट्या यांतून खाणेंपिणें वर्ज्य करून पत्रावळी व द्रोण यांच्यांतून भोजन करीत जावें; त्यानें बिछान्यावर निजणें सोडून गवताच्या आसनावर शयन करावें; व त्याचप्रमाणें त्यानें एखाद्या

१. याविषयीं हा इतिहास लिहिणारा टॉड् साहेब खुद्द असें लिहितो कीं, 'मी इतिहासशोधनार्थ फिरत असतां व रजपुतांच्या वीर्यपराक्रमाचीं ठिकाणें बघत असतां, अनेक डोंगर व किल्ले चढलों; पुष्कळ नद्या नाले ओलांडून गेलों; आणि कित्येक मैदानें हिंडलों. हीं सर्व स्थळें जणूं काय प्रतापसिंगाच्या व तत्पूर्वजांच्या प्रतापशाली राज्यकारकीर्दीचे प्रवेशामागून प्रवेश आणि देखाव्यामागून देखावे दाखविणारीं नाटकगृहेंच आहेत असें मला भासलें. या फिरण्यांत मी जयमल्ल व पट्टा यांचे वंशजांना भेटून त्यांच्या पूर्वजांच्या हकीकती विचारीत पुसीत होतों व तेव्हां कित्येक वेळां तें त्या हकीकतींचीं गीतें ह्मणून दाखवीत असतां त्यांच्या डोळ्यांतून गहिंवर येऊन टिपें निघालेलीं मीं पाहिलीं आहेत !'

तपस्व्याप्रमाणें दाढी वाढविली होती. ह्या त्याच्या विदेहीपणाच्या खाजगी खुणा व चिन्हें झालीं. पण त्यानें आपला हा वैभवसंपादनाचा निश्चय सर्वश्रुत करण्याकरितां, सर्व प्रसिद्ध समारंभांतून व सेनेमध्यें नौबदी व नगारे वाजविण्याची चाल होती ती मुळींच बंद केली. प्रतापसिंगाचा हा विदेहीपणा मेवाडच्या राजघराण्यांत अजूनही अंशतः तरी चालू आहे. ते डोकीचे केश व दाढी तर वाढवितातच. परंतु जरी ते सोन्यारुप्याच्या पात्रांतून खाणेंपिणें चालवितात व बिछान्यांवर निजतात तरी धातुपात्रांच्या खालीं पानें व बिछान्यांखालीं गवत घालीत असतात, इतका त्यांणीं नियम अजून पाळिला आहे.

प्रतापसिंग नेहमीं असें ह्मणत असे कीं, 'संगराण्याचे मागून उदेसिंग झाला नसता तर मोंगलांचें येवढें प्राबल्य वाढलें नसतें व राजस्थानांत त्यांचा अम्मल झाला नसता.' तरी जीं राज्यें पूर्वी अगदीं जर्जर झालीं होतीं तीं या शतकांत सावरून सजीव होऊं लागलीं होतीं. गंगा व यमुना या दोन्ही नद्यांच्या मधील प्रांतांत हळूहळू कांहीं विशेष महत्वाच्या गोष्टी घडून येऊं लागल्या. त्याचप्रमाणें अंभेर आणि मारवाड येथील राजांनीं वर डोकीं उचलून गतवैभव मिळविण्यास कमरा बांधिल्या. त्यांत मारवाडच्या राजानें तर दिल्ली येथील शिरशाहाचा पराभव केल्यामुळें तो बराच प्रबळ झाला. आणि याचप्रमाणें चंबळानदीच्या दोन्ही तीरचे बरेच संस्थानिक ठाकूर जोरवान् होऊं लागले होते. ह्याप्रमाणें चोहोंकडून अगदीं सिद्धता होती. ह्या सर्व राजमंडळास एक कोणी पराक्रमी पुरुष पुढारी पाहिजे होता. ह्मणजे मुसलमानांच्या हातांत गेलेलें चितोडचें राजछत्र तेव्हांच काबीज करण्यास उशीर नव्हता. आणि अशा प्रकारचा पराक्रमी व शूर पुरुष त्या वेळीं त्या सर्वांच्या सुदैवानें संगराणा मिळाला होता. संगराण्याची कुलीनता आणि शौर्य हीं हिमालयापासून रामेश्वरापर्यंत सर्वमान्य होतीं. असा योग्य पुरुष पुरोगामी मिळाल्यावर सर्व राजांनीं व ठाकुरांनीं आपआपलीं राज्यें व मुलूख काबीज करण्याकरितां मनोभावेंकरून संगराण्यास साह्य केलें होतें. व तेंच साह्य त्यांजकडून, मध्यंतरीं उदेसिंगासारखा भीरु व पळपट्या राजा झाला नसता किंवा अकबरासारखा पराक्रमी बादशाह त्याकालीं त्यांच्या दुस्मानांत नसता तर, संगाचा नातू जो प्रतापसिंग याला मिळून, रजपुतांचा राज्यदीप पुनरपि उज्ज्वलित झाला असता. परंतु त्या दोन्ही गोष्टी अनिष्ट झाल्यामुळें त्या राजांस व ठाकुरांस तितका दम न राहून ते मेवाडच्या राण्यास साह्य करण्याविषयीं अगदीं उदासीन झाले होते. उदेसिंगाच्या भीरुपणामुळें आणि अकबराच्या पराक्रमानें त्यांस राण्याला कोणत्याही प्रकारची मदत करण्याची उमेद राहिली नव्हती. ह्याप्रमाणें प्रतापसिंग हा केवळ असहाय असा,

आपल्या राज्यप्राप्तीची महत्वाकांक्षा धरून, होईल तें प्रयत्न हळहळ करीत होता.

प्रतापानें पुढें कांहीं दूरदर्शी व अनुभविक अशा कित्येक राजांच्या व संस्थानिकांच्या मदतीनें व मसलतीनें, आपल्या पुढील हेतुसिद्धीस साधनीभूत अशा कांहीं व्यवस्था चालविल्या. त्यानें कोणीं किती व कशा प्रकारें साह्य करावें याबद्दलचे नियम ठरवून टाकिले; आणि सरदारांना व आश्रितांना नव्यानव्या जाहगिरी व इनामें देऊन त्यांस उत्तेजन दिलें कीं, त्यामुळें त्यांना हुरूप येऊन स्वामिकार्यार्थ झटून पडण्याची त्यांस उमेद यावी. प्रतापसिंग हा या वेळीं कुमळमेर येथें राहत होता, व तेंच त्याच्या राज्याचें राजधानीचें शहर झालें होतें. ह्मणून त्यानें त्या शहरास व तेथील किल्ल्यास आणि गोगुंडा वगैरे इतर किल्ल्यांस तट वगैरे घालून व त्यांजवर गडकरी ठेवून चांगला बंदोबस्त केला. त्याचप्रमाणें त्यानें सपाटीचा मुलूख ओसाडच ठेवून आपली सर्व रयत डोंगरी प्रांतांत राहण्यास पाठवून दिली. ह्याप्रमाणें त्यानें बनास व बेरीस या दोन नद्यांच्या उभय तटांवरील सर्व पिकाऊ मुलूख बेचिराक (निर्मनुष्य—दिवा लावण्यास कोणी नाहीं असा) करून ठेविला होता.

प्रतापसिंगानें येणेंप्रमाणें जो बंदोबस्त व व्यवस्था चालविली होती त्या संबंधानें केलेल्या ठरावांस किंवा हुकुमांस जो कोणी मोडील अथवा अमान्य करील त्यास त्यानें फार कडक शासन ठेविलें होतें. व ह्याप्रमाणें त्यानें कित्येकांस त्यांच्या बेहुकमतीबद्दल अशीं कडक शासनेंही केलीं; अशाविषयीं अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत. आपण केलेली व्यवस्था व लावून दिलेलीं कामें बरोबर रीतीनें लोक करीत आहेत किंवा नाहींत हें पाहण्याकरितां तो स्वतः कांहीं घोडेस्वार बरोबर घेऊन आपल्या बंदोबस्ताच्या ठिकाणीं फिरत असे. अशा प्रकारच्या व्यवस्थेनें तो सर्व प्रांत शत्रूला वैराण दिसूं लागला. जेथें मोठमोठीं धान्यांचीं शेतें उगवावयाचीं तेथें जिकडे तिकडे गवताचें रान माजलें; ज्या राजमार्गावरून नेहमीं लोकांची व रथघोड्यांची दाटी असावयाची तेथें बाभूळ वगैरे कांटेरी झुडपांची दाटी झाली; आणि जेथें मोठमोठीं राजमंदिरें व धनिकांचीं गृहें होतीं तेथें सर्वत्र क्रूर व हिंसक अशा वनपशूंची वस्ती झाली. त्या वेळीं सुरतेस जो विलायती माल येत असे तो व्यापाराकरितां व बादशाहाकडे दिल्लीस जात असे. तो माल जाण्याचा रस्ता मेवाडांतूनच असल्यामुळें प्रतापानें मध्येंच तो माल लुटून न्यावा व तो व्यापार बंद पाडावा, असा क्रम चालविला होता.

येणेंप्रमाणें प्रतापसिंगाची व्यवस्था व धामधूम चालली असतां अकबरानें रजपुतांशीं लढाई देण्याची तयारी चालविली. त्यानें दिल्लीहून आपलें सैन्य उठवून त्याचा अजमिरास मुख्य गोट केला. त्या वेळीं अजमीर हें त्याच्या राज्यांतील २२ सुभ्यां-

पैकीं एक सुभा होतें, त्यामुळें तेथें त्याचें बादशाही ठाणें व थोडी बहुत फौज असे पूर्वीपासून असेच. ह्या वेळीं अकबराला रजपूत राजांपैकीं चांगले चांगले राजे मिळाले होते. शिरशाहाबरोबर मोठ्या शौर्यानें लढणारा मारवाडचा ठाकूर मालदेव जो हुमायुनाच्या दैवदुर्विलासांतही त्याला पकडण्याच्या विचारांत होता तो जयपूरच्या भगवानदासाप्रमाणेंच शेवटीं अकबराला मिळाला. आणि प्रतापसिंग गादीवर बसल्यानंतर दोन वर्षांनींच ह्मणजे इ० स० १५६९ या वर्षी त्यानें आपला मुलगा उदेसिंग यास खंडणी देऊन अकबराकडे पाठविला. उदेसिंगाची व अकबराची नागोरास गांठ पडली. त्या वेळीं अकबर वर लिहिल्याप्रमाणें प्रतापाचा समाचार घेण्याकरितां आपली फौज घेऊन दिल्लीहून अजमीरास येण्याकरितां निघाला होता. याच वेळीं अकबरानें मंदोड येथील रावास 'राजा' असा किताब व वरील मारवाडचा राजपुत्र उदेसिंग यास 'मोठा राजा' अशी पदवी दिली. त्याचप्रमाणें कनोजच्या राजाचे वंशजांस उजवीकडचा मान देण्याची सनद दिली. ह्याप्रमाणें त्या वेळीं आपल्याला रजपुतांची अनुकूलता मिळण्याविषयीं जें जें करणें इष्ट व उचित वाटलें तें तें अकबरानें करण्यास हयगय केली नाहीं. व त्याप्रमाणें या नुस्त्या मानसन्मानालाच लुब्ध होणारे लब्धप्रतिष्ठ व जात्यभिमानशून्य असे अधम रजपूत राजे त्याला पुष्कळ मिळत चालले. त्यांतही मारवाडच्या राठोडानें तर आपला लोभीपणा आणि हलकट बुद्धि दाखविण्याची कमालच केली. त्यानें रजपूत जातीच्या अभिमानाला व वैभवाला अत्यंत अनुचित असें काम करण्याचा पाया घातला व त्या नीच कामाबद्दल जी त्याला देणगी आणि पदव्या मिळाल्या, त्यांबद्दल तो आपल्यास मोठें भूषण समजूं लागला. मारवाडच्या मालदेवानें अकबराशीं सख्य करण्याकरितां आपला पुत्र उदेसिंग यास खंडणी व नजराणा देऊन पाठविल्याचें व त्याची व अकबराची नागोराजवळ गांठ पडल्याचें जें नुक्तेच वर सांगितलें, त्या उदेसिंगानें अकबराच्या चरणीं बापानें पाठविलेली खंडणी व नजर अर्पण करूनच नुस्तें 'सख्य' जोडिलें नाहीं; तर आपली कन्या जोधबाई ही उपवरा झाली होती ती अकबर बादशाहाचे मुलास[1] देऊन 'सख्यसंबंध' जोडिला! बादशाहाशीं केलेल्या या नव्या सोयरिकीबद्दल बादशाहानेंही त्याचे उपकार ठेविले नाहींत. या वधूदानानें उदेसिंग राठोड याचा बादशाहाचे दरबारीं सर्व रजपूत स्नेही राजांपेक्षां फार मोठा मानमरातब वाढला इतकेंच नव्हे; तर या अपूर्व महत्कृत्याबद्दल अकबर बादशाहानें आपल्या या रजपूत व्याह्यास पुढें लिहिलेला पंधरा लाखांचा मुलूख तोडून दिला:—गोदवाड ९ लाख; उज्जनप्रांत

---

१. ही अकबरपौत्र शाहजहान याची आई असून, तिची सुंदर व भव्य कबर आग्र्याजवळ सिकंदरा नांवाच्या गांवीं अकबराच्या कबरेजवळच आहे.

२॥ लाख; देवलपूर १॥। लाख; व बडनावर २॥ लाख. यामुळें मारवाडच्या राजाचें (जोधपूरचें) उत्पन्न दुप्पट वाढलें. याचप्रमाणें जयपूरवाल्यांनींही केलें. तेव्हां त्यांचीं हीं उदाहरणें बघून नंतर राजस्थानच्या इतर किरकोळ ठाकुरांनींही तोच मार्ग स्वीकारून, दिल्लीच्या तख्ताला शरणागत होऊन त्या दरबारीं ते पूर्वीपेक्षां अधिक वैभव व मान पावले. येणेंप्रमाणें रजपुतांसारख्या अभिमानी व शूर लोकांकडून नीच मानलेल्या व कट्टे दुस्मान झालेल्या मोंगल लोकांबरोबर बेटीव्यवहार सुरू व्हावा, या अघटित घटनेचें मुसलमानी इतिहासलेखकांस मोठें महत्व वाटून, त्यांनीं आपल्या ग्रंथांतून अशा मिश्र सोयरिकी करणाऱ्या रजपूत राजांस, 'दिल्लीच्या बादशाहीचे एककालीन आधारस्तंभ व भूषणें' असें ह्मटलें आहे. परंतु यांत आश्चर्य नाहीं.

रजपूत बांधवांच्या या नीचतम कृत्यांनीं प्रतापसिंगाचें अंतःकरण अगदीं खवळून गेलें. या कृत्यांच्या योगानें त्यांचें प्रतापसिंगाशीं वैर वाढलें इतकेंच नव्हे, तर त्यांनीं आपल्या उच्च कुलांस कलंक लाविला. प्रतापाला आजपर्यंत एकटा अकबर हा मोंगलच दुस्मान होता; परंतु आतां तर त्याचे जातभाई देखील त्याच्या शत्रुमालिकेंत आल्यामुळें त्याची तद्विषयक काळजी व चिंता जास्त वाढावी हें साहजिकच होतें. परंतु तो त्याबद्दल बिलकुल गडबडला नाहीं. बहुतकरून प्रत्येक रजपूत ठाकूर आपली बहीण, मुलगी किंवा आप्तस्वकीयांतली एखादी वधू मुसलमानी घराण्यांत देऊन दिल्लीदरबारचा अंकित व सरदार झाला होता. इतकेंच नव्हे; तर कितीएक रजपूत ठाकुरांनीं स्वधर्मत्याग करून मुसलमानी धर्मही स्वीकारिला. नाहीं ह्मणायाला बुंदीचा ठाकूर मात्र या कलंकापासून दूर राहिला होता. ह्याप्रमाणें जों जों रजपुतांचा निंद्य प्रकार प्रतापसिंग पाही, तों तों त्याचा निश्चय आणि मोंगलांशीं शत्रुत्व हीं वाढत चाललीं. त्यानें मुसलमानांबरोबर कन्याव्यवहार ठेवणाऱ्या एकंदर रजपूत कुळांशीं, निष्कलंक राहिलेल्या कोणाही रजपुतानें सोयरगत करूं नये, असा सक्त हुकूम केला. मात्र दिल्ली, पट्टण, मारवाड आणि धार येथील फार जुनीं कुळें, ज्यांनीं वरील निंदाचरणापासून आपलीं कुळें बचावलीं त्यांशीं सोयरगत ठेवावी असें ठरविलें. प्रतापसिंगानें जो हा ठराव केला तो त्याच्या अस्तित्वापर्यंत तर चाललाच. परंतु त्याचे पश्चात् दिल्लीचें तख्त बुडेपर्यंतही तो नियम अव्याहत चालून जयपूर-जोधपूरच्या घराण्यांशीं मेवाडच्या राणेवंशीयांनीं मुळींच सोयरसंबंध ठेविला नाहीं. वरील दोन्ही घराण्यांतले बखतसिंग व जयसिंग हे पूर्ववतच दिल्लीदरबारांत मोठे प्रतिष्ठित व श्रीमान् सरदार होते; व राणेवंशीय अगदीं गरीब व गतवैभव असे राजे झाले होते. परंतु त्यांनीं त्यांशीं सोयरसंबंध अगदीं बंद केल्यामुळें त्या दोन्ही घराण्यांस अपमान वाटून त्यांनीं राणेवंशीयांबरोबर, 'आमच्याशीं सोयरसंबंध ठेवा,' ह्मणून वि-

नंतिपत्रें पाठविलीं. ते अस्सल कागद उदेपूरच्या दफ्तरांत अजून आहेत. त्यांत त्यांनीं असें विनम्रपणें ह्मटलें आहे कीं, 'आह्मांला शुद्ध करून घ्या,' 'आमचें पुनः उपनयन करून आह्मांला पुनर्जन्म द्या,' 'आह्मांला रजपूत बनवा' इत्यादि. याप्रमाणें त्या घराण्यांस मोठा पश्चात्ताप झाला. परंतु त्यांच्या ह्या विनवण्या पहिलीं शंभर वर्षेपर्यंत तर मुळींच कोणीं ऐकिल्या नाहींत. पुढें राणेवंशीयांनीं त्यांचें ह्मणणें कबूल केलें. तें तरी अशा अटींवर कीं, त्यांनीं पुनरपि आपल्या मुली, बहिणी किंवा इतर रजपूतकन्या मुसलमानांस देऊं नयेत; व उदेपूरच्या वंशांतल्या मुली ज्यांस दिल्या जातील त्या मुलींचेच पुत्र त्या त्या गादीचे वारस होतील—मग ते मुलगे अज्ञान असोत किंवा कसेही असोत. पुढें दिल्लीची बादशाही आटोपल्यावर तर रजपूत कुळांकडून हे नियम अनायासेंच निर्वेधपणें पाळले गेले.

उदेपूरच्या राणेवंशाचा (सिसोदियांचा) अभिमान आणि पावित्र्य यांचा लौकिक आणि वजन रजपूत लोकांत किती होतें याविषयींची एक गोष्ट येथें प्रसंगोपात्त सांगितल्यास वावगी होणार नाहीं:—अंभेरचा राजा मानसिंग हा या काळीं फार प्रसिद्ध होता. तो महापराक्रमी असून त्याचे वेळेपासून त्याच्या प्रांताला ऊर्जितावस्था प्राप्त झाली असें ह्मणतात. अंभेर(जयपूर)चा राजा भगवानदास—मानसिंगाचा बाप—याचे वेळेस बाबरानें रजपुतांच्या मुली मोंगलांस करण्याचा प्रचार पाडिला व त्याप्रमाणें भगवान यानें आपली मुलगी प्रथमतः शाहजादा (युवराज) हुमायून यास दिली होती. तेव्हां अर्थात् मानसिंग हा अकबराचा मामा होत होता. जयपूरचे राजे पहिल्यापासूनच चांगले पराक्रमी असल्यामुळें त्यांजपासूनच या सोयरिकीनें मोंगलबादशाहीचें फार कल्याण झालें. मानसिंग हा बुद्धिमान् आणि धाडसी असल्यामुळें दिल्लीदरबारांत असलेल्या पराक्रमी सरदारांमध्यें तो श्रेष्ठ होता. अकबराला जो कांहीं जय मिळून त्याच्या कीर्तीचा डिंडिम वाजतो आहे त्याचें अर्धें श्रेय त्याचा मामा मानसिंग याच्या शौर्यपराक्रमाकडे आहे. मानसिंगानें दिल्लीच्या बादशाहीकरितां पश्चिमेस काबूल आणि पूर्वेस ब्रह्मदेशांतील अराकान, इतका प्रांत जिंकून बादशाहीकडे दिला. हा जो त्याणें येवढा जय मिळविला या कामांत त्याणें केवळ आपल्याच

---

१. राजा मानसिंग हा अकबराचा विजय प्रसृत करण्याकरितां याप्रमाणें मुलूखगिरीला निघाला असतां सिंधुनदीच्या (अटकनदीच्या) जवळ येऊन पोहोंचला. हिंदुलोकांस अटकनदीच्या पलीकडे जाण्याविषयीं धर्मशास्त्राचा प्रतिबंध असल्यामुळें मानसिंग तेथेंच थांबला. ह्याच्यानें धर्मशास्त्रोल्लंघन करून अटकनदीचें उल्लंघन करवेना. व ह्या मजकुराचें त्यानें अकबरास पत्र लिहिलें. तेव्हां अकबरानें त्याला जें उत्तर पाठविलें त्यांत त्यानें हा पुढील दोहरा लिहून ह्याच्या शंकेचें समाधान केलें:—

फौजेकडून काम केलें. मुसलमानी फौज मुळींच घेतली नाहीं[१]. अकबराला रजपूत राजांचें मन कसें वळवावें व त्यांचे अभिमान काय असतात हें पूर्णपणें माहित होतें, व त्याप्रमाणें तो त्यांशीं त्यांचें मन खुष राहील असें वर्तन करीत असे. त्यामुळें रजपूत राजे ह्मणजे त्याचे अगदीं अभिमानी व कैवारी मित्र व चाकर झाले होते.

राजा मानसिंग हा एके वेळीं दिल्लीच्या बादशाहाचे वतीनें दक्षिणेंतील सोलापूर प्रांत काबीज करून परत हिंदुस्थानांत चालला असतां, कुमळमेर येथें प्रतापसिंग होता ह्मणून त्याचे भेटीकरितां त्याणें तेथें मुक्काम केला. राजा मानसिंग आपल्या भेटीकरितां येथें आला आहे असें ऐकतांच प्रतापसिंग त्याला उदेसागर नांवाच्या तलावापर्यंत सामोरा येऊन त्यानें त्याचा करावयाचा त्या रीतीनें मोठा मानसन्मान केला; आणि त्याला एक मेजवानी दिली. मेजवानीची सर्व तयारी होऊन पात्रें वाढिलीं व राजा मानसिंग याला भोजनास बोलावणें पाठविलें. त्याप्रमाणें तो आला. परंतु प्रतापसिंग मुद्दाम आपला मुलगा उमराव याला मानसिंगाचे तर्तुदीस ठेवून आपण कपाळ दुखतें ह्मणून त्या समारंभास गेला नाहीं. मानसिंगानें 'राणा कां आला नाहीं ?' ह्मणून उमराव यास विचारितां त्यानें 'राणेसाहेबांची प्रकृति स्वस्थ

---

**सब है भूम गोपालकी, उसमें अटक कहां ? ।**
**जिसका मनमें अटक है, सो ही अटक रहा ॥**

हें समाधान पाहून मानसिंगानें आपला दिग्विजय पुढें चालवून पूर्ण केला. अशी एक आख्यायिका प्रसिद्ध आहे.

१. केवळ आपलीच एकजातीची फौज बाळवून तिजकडून विजय संपादन करणें हा अभिमान कांहीं सामान्य नाहीं. मानसिंगाचा असाच अभिमान होता असें दिसतें. तरी, फौज एकजातीची असली तरच विजय होतो आणि एकजातीची नसली तर होत नाहीं असें कांहीं नाहीं. फौजेकडून जयापजय होणें हें मुख्यत्वेंकरून तिच्या मुख्य सरदारावर अवलंबून आहे. फौजेचा पुढारी चांगला धोरणी, युक्तिवान्, अनुभविक आणि शूर असला ह्मणजे त्याची आज्ञा, फौज जीवांत जीव आहे तोंपर्यंत तर कांहीं सहसा व्यर्थ दवडीत नाहीं. दक्षिणेंत शिवाजी महाराजांनीं जो पराक्रम केला तोही असाच एकजातीच्या मराठी फौजेकडून केला. परंतु पराक्रम किंवा जय हा फौजेच्या एकजातीवरच नसून तिजवरील मुख्याच्या नैपुण्यावर आणि युद्धकौशल्यावर मुख्यत्वें अवलंबून असतो ही गोष्ट सर्वदा लक्ष्यांत ठेविली पाहिजे. हल्लींच बघितलें तर इंग्रज सरकारची जी फौज आहे ती एकाच जातीची नसून तिजमध्यें अठरापगड जातींचे लोकांचा समावेश आहे. ह्मणून त्यांच्या पराक्रमांत कांहीं कचराई किंवा कपट आहे असें नाहीं. त्यांचे जनरल असे हुशार असतात कीं, अशा नानाजातियुक्त सैन्याला, काबूल, मिसर, इराण, माल्टा वगैरे कोठेंही दूरदूरच्या ठिकाणीं नेलें तरी त्यांजकडून व्हावयाचें तें शौर्य ते गाजवितातच. फौजेवरील सरकार जर लेचपिचा आणि कमकूवत असला तर मग मात्र तिची भंबेरी उडून जावयाची हा सिद्धांत होय.

नसून कपाळ दुखतें आहे' असें सांगितलें. त्यावर मानसिंग ह्मणाला, 'राणेसाहेबांची प्रकृति अस्वस्थ कां आहे व त्यांनीं कपाळ दुखण्याचें कां निमित्त केलें हें मी समजलों. परंतु ज्याकरितां त्यांनीं असें मिष केलें ती गोष्ट कांहीं आतां परत येत नाहीं. ते जर येथें येत नाहींत तर आमचे बरोबर कोण जेवणार ?' त्यावर राण्याकडून उत्तर आलें कीं, 'तुह्मी त्याबद्दल राग मानूं नये. माझ्यानें या प्रसंगास येववत नाहीं.' यावरही आणखी कांहीं प्रश्नोत्तरें परस्परांमध्यें फिरलीं: व शेवटीं प्रतापसिंगराण्यानें साफ् सांगून पाठविलें कीं, 'ज्या रजपुतानें आपली बहीण मोंगलास दिली तो त्या यवनाबरोबर जेवलाही असेलच. तेव्हां अशा भ्रष्ट रजपुताचे बरोबर बसून भोजन करणें मला प्रशस्त वाटत नाहीं.' हें अपमानकारक उत्तर ऐकून मानसिंग तसाच पुढें आलेल्या अन्नाला नमस्कार करून पात्राला स्पर्श न करितां उठला. इतक्यांत राणा तेथें आला. त्यास पाहून मानसिंग त्याला ह्मणाला, 'आह्मीं आपल्या बहिणी मोंगलास दिल्या याचें कारण तुमचें राज्य निर्वेधपणें कायम राहावें ह्मणून.' तो आणखी ह्मणाला कीं, 'अशा प्रकारच्या कृत्यानें आमचा मान तर गेलाच आहे, परंतु तुमचा मान तरी रहावा ह्मणून आह्मीं झटत आहोंत; असें असून जर तुह्मांला आमच्याविषयीं वैषम्य वाटत असेल तर तुमच्या स्थितीलाही धोका येऊन तुमचें या देशांत पाऊलही राहावयाचें नाहीं; त्याचें प्रायश्चित्त तुह्मांस भोगावें लागेल.' त्यावर राण्यानें उत्तर दिलें, 'बरें आहे; तसा प्रसंग आल्यास पाहून घेऊं.' हें उत्तर ऐकिल्याबरोबर मानसिंग रिकिबींत पाय ठेवून घोड्यावर स्वार झाला; आणि राण्याकडे वळून, ह्मणाला, 'मी तुझा हा मान खालीं करीन तरच नांवाचा मान होईन.' त्यावर पुनः राण्यानें उत्तर केलें, 'फार चांगलें; मला त्यांतच आनंद आहे. परंतु जेव्हां आमचा मान खालीं करावयास तुह्मी याल तेव्हां आपल्या भाच्यास घेऊन या ह्मणजे झालें.' याप्रमाणें मानसिंग मोठ्या रागानें तेथून निघून गेला. परंतु त्याबद्दल प्रतापानें मुळींच फिकीर बाळगिली नाहीं. राजा मानसिंग निघून गेल्यावर जेथें त्याजकरितां पात्रें वगैरे मांडिलीं होतीं, ती जागा सर्व झाडून सारवून पवित्र केली. त्याचप्रमाणें त्या मेजवानीच्या संबंधाचीं सर्व पात्रें व भांडींकुडीं धुऊन टाकविलीं; आणि सर्वांनीं, मानसिंगाच्या संसर्गदोषजन्यपातकापासून मुक्त व्हावें ह्मणून सचैल स्नानें करून व सर्वत्र गंगोदक शिंपडून शुद्धता केली.

हा झालेला सर्व प्रकार दिल्ली येथें अकबर बादशाहास कळून त्याला मोठा राग आला. राजा मानसिंगाचा प्रतापसिंगानें जो अपमान केला तो केवळ माझाच अपमान केला असें त्यास वाटून, आजपर्यंत जें आपण समजत होतों कीं, रजपुतांचा पीळ आणि अभिमान मोडला, तें खोटें आहे, असें त्याला कळून आलें. नंतर त्यानें प्रतापाशीं

युद्ध करण्याची तयारी करून कूच केलें. पुढें ही लढाई हळदीघांट येथें झाली. तिज-मध्यें प्रतापाची जी कीर्ति झाली ती, जोंपर्यंत मेवाडांत सिसोदिया कुळींचे राजे आहेत तोंपर्यंत सारखी राहील व कोणताही भाट त्या कीर्तीचें वर्णन करण्यास कधींही चुकणार नाहीं. ह्या लढाईंत खुद्द अकबर नव्हता; तर त्याचा मुलगा युवराज सेलीम हा असून, तो राजा मानसिंग याचे अनुसंधानानें चालत असे. या सैन्याबरोबर सागरजीचा बाटलेला मुलगा मोहबतखान हाही होता. प्रतापाकडे वीसहजार सैन्य अकबराचे मुलाबरोबर झुंजण्यास सिद्ध असून, त्यास डोंगरांचा व जंगलांचा आश्रय चांगला होता.

बादशाही फौज मुलखांत शिरून हळदीघांटाकडे वळली आणि राण्याची फौज कुमळमेर येथून निघून पश्चिमेच्या अंगास ऋखभनाथाकडे फिरली. ऋखभनाथाचें[1] खोरें ह्मणजे प्रचंड डोंगर व नद्या यांनीं वेष्टित असून फार अडचणीचें आहे. या खोऱ्यामध्यें शिरण्याच्या वाऱ्या फारच अरुंद, एक गाडी चालेल इतक्या रुंदीच्या, असून त्या वाऱ्यांचे दोहों बाजूंस मोठमोठे उंच उंच खडक आहेत. कुमळमेरपासून ऋखभनाथ हें स्थान उत्तर-दक्षिण ४० कोस लांब आहे. ह्या सर्व गोष्टींमुळें कुमळमेर हें ठाणें साहजिकच चोहोंकडून पक्क्या बंदोबस्ताचें झालें होतें. त्यांतही राण्यानें आपले कडवे रजपूत लोक खालीं व वर उंच खडकांवर असें चोहोंकडे ठेविले असून त्यांना त्या प्रांतांतले मूळचे रहिवाशी जे भिल्ल लोक ते आपल्या जुन्या आयुधांसह—तीरकमठे घेऊन—मोठमोठे दगड शत्रूंवर ढकलण्याकरितां बरोबर घेऊन साह्यार्थ सिद्ध होते.

प्रतापसिंगाला या समयीं बरेच रजपुत लोक येऊन मिळाले होते. त्यामुळें त्यास विशेष अवसान आलें. त्यानें आपलें किरमिजी रंगाचें निशाण आपल्या सैन्याचे पुरोभागीं उभें केलें होतें व त्याचे लोक निकरानें लढण्यास सिद्ध होते. हा सर्व लढाईचा योग मूळ मानसिंगानें आणिला; त्या अर्थी मानसिंग हा मुख्यत्वेंकरून प्रतापाचा द्वेष्टा झाला होता. परंतु कसा झाला तरी तो आपला रजपूत आहे ह्मणून त्याचा प्रथमतः सूड घेण्यापूर्वीं प्रतापानें सेलिमावर मुख्यत्वेंकरून शस्त्र धरिलें. त्यानें त्याचे सर्व लोक तोडून टाकून नीट त्याचे हत्तीवर चाल केली. सेलीम हा हत्तीवरील हौद्यांत बसला होता, त्याला मारण्याकरितां प्रताप आपल्या कृष्णवर्ण चित्तक नांवाच्या अश्वावर ब-

---

१. ऋखभनाथ हें स्थान ऋखभदेव किंवा ऋषभदेव या नांवानें गुजराथेंत प्रसिद्ध आहे. अहमदाबादेपासून आमनगर व ईडर ४ कोस आहे; तेथून २० कोसांवर अगदीं झाडींत सामळाजी ह्मणून स्थान आहे; त्यापुढें केशरीनाथ ह्मणून श्रावकांचें एक क्षेत्र असून त्यापुढें ऋषभदेव हें स्थान झाडींत व डोंगरी प्रदेशांत आहे. अहमदाबादेपासून ऋषभदेवाला जाण्याचा हा मार्ग आहे.

सून हत्तीवर धांवला. नंतर भाल्याच्या वारांनीं त्यानें सेलिमाच्या मागील व पुढील तैनातीच्या लोकांस हत्तीवरून ह्मणून खालीं पाडिलें; आणि त्याच्या घोड्यानें लगेच पुढील दोन्ही पाय हत्तीवर दिल्याबरोबर सेलिमावर प्रतापानें भाल्याचा वार केला. परंतु तो भाला हौद्यावरच लागून सेलीम बचावला. त्या हौद्याला बाहेरून लोखंडी पत्रे लाविले होते, त्यामुळें हौद्यांत भाला शिरला नाहीं. येणेंप्रमाणें सेलीम मोठे मुष्किलीनें वांचला. नाहीं तर याच वेळीं तो प्रतापाच्या हातानें समरभूमीवर पडावयाचा होता. प्रतापाच्या एकंदर शौर्यवीर्याचे प्रसंगीं त्याच्या वरील आवडत्या घोड्यानें जीं कामें केलीं तीं त्याच्या बखरींत फार चांगल्या रीतीनें वर्णिलीं आहेत. त्या घोड्यानें अनेक प्रसंगीं आपल्या यजमानास मोठमोठ्या संकटांतून वांचविलें होतें. असो. प्रतापानें पहिल्यानें हत्तीवरील महावत व सेलिमाचे इतर तैनातदार यांस मारून पाडिल्यामुळें हत्तीला आवरणारा सेलिमाजवळ कोणीच नव्हता व यामुळें तो हत्ती तुफान होऊन रणभूमीमध्यें अनावर झाला, व तेणेंकरून त्याच वेळीं प्रतापाच्या हातानें जो सेलिम मरणार होता तो अनायासेंच वांचला. ह्या वेळीं सेलिमाची अशी दशा पाहून त्याच्या संरक्षणास त्याचे मोंगल लोक धांवले व प्रतापाच्या विजयास हात लावण्याकरितां मेवाडदेशचे अभिमानी रजपूत प्रतापाचे साह्यार्थ त्याचे मागें पुढें झाले. ह्या वेळीं प्रतापसिंगाला सात जखमा–तीन भाल्याच्या, एक गोळीची आणि तीन तरवारीच्या–झाल्या होत्या. ह्या समयीं दोहों फौजांची मोठीच लढाई झाली. प्रतापसिंगाचे मस्तकावर नेहमीं राजछत्र असे, त्या खुणेवर सेलिमाचे फौजेनें त्याला वेढा दिला. त्यांतून तो तीन वेळां सुटून गेला. तरी शेवटीं त्याचे पाठीस शत्रूची फौज लागलीच. परंतु त्याचा घोडा उत्कृष्ट होता ह्मणून तो निभावला. एकदां तर शत्रुसैन्यानें त्याला अगदींच गांठिलें होतें, आणि पुढें बघतो तों ओढा होता. तेव्हां त्यानें घोड्याला अम्मळ दाबिलें; त्यासरसा घोडा उडी मारून ओढ्याचे पार गेला. तेव्हां अर्थात् शत्रूचे लोक तितकेच थबकले. असे प्रसंग तर प्रतापाला वारंवार आले होते व अनेक संकटांतून तो आपल्या घोड्यामुळेंच बचावला होता. त्या घोड्याला जखमाही पुष्कळ लागल्या होत्या, त्यामुळें त्याच्यानें टिकाव धरवेना. आणि अकबराच्या फौजेनें तर त्याचा अगदीं पिच्छा पकडला होता.

एकदां तो असाच एकाकी आपल्या वरील घोड्यावर बसून शत्रूच्या लोकांस चुकवीत आडवाटेनें फिरत असतां त्याच्या मागें दोन मोंगल पठाण लागले. त्या दिवशीं सारा दिवसभर प्रताप घोड्यावरच असून घोडा एकसारखा दवडत होता; आणि वर लिहिल्याप्रमाणें तर शत्रु पाठीवर येऊन ठेपले. त्यांना हुलकावीत हुलकावीत प्रतापसिंग आपला बचाव करण्यास बघत होता. परंतु घोडा अगदीं श्रमून गेला. त्याच्यानें पा-

ऊल उचलेना. अनेक ओढे नाले विलक्षण आणीबाणीच्या प्रसंगीं कुदून गेल्यानें तो घोडा फारच श्रांत झाला होता. इतक्यांत मागून त्याच्या देशभाषेंत कोणी, 'अरे निळ्या घोड्यावरच्या स्वारा, भिऊं नकोस' असें मोठ्यानें ओरडून बोलल्याचें त्यानें ऐकिलें. त्याबरोबर त्याला धीर येऊन त्यानें मागें उलटून बघितलें तों–आश्चर्याची गोष्ट ही कीं, तो त्याला धीर देणारा त्याचा फितूर झालेला भाऊ होता असें त्याला दिसलें !

प्रतापाचा सूक्त ह्मणून एक भाऊ होता. त्याचें व प्रतापसिंगाचें पहिल्यापासूनच खडाष्टक असून प्रतापाला राज्य मिळाल्यामुळें तो अकबराकडे फितूर झाला होता. त्यानें वरील कठिण प्रसंगांत आपला भाऊ सांपडला असून यांतून त्याची वांचण्याची आशा नाहीं असें पाहून, तो तत्काळ त्याचे साह्यार्थ आला. तो आपले पूर्वींचे द्वेष, अपमान आणि महत्वाकांक्षा हीं सर्व विसरून जाऊन, आपल्या बांधवास मदत करण्याविषयीं त्याला अपूर्व प्रेरणा झाली. हा तरी प्रतापाचे दैवाचा विलक्षणच योगायोग ह्मटला पाहिजे. सूक्तानें प्रतापसिंगाचे मागें लागलेल्या मोंगलांस कापून टाकून त्याला संकटमुक्त केलें. हें पाहून प्रतापानेंही घोड्यावरून खालीं उतरून बंधुप्रीतीनें आणि कृतज्ञतापूर्वक कडकडून आलिंगन दिलें. यजमान पाठीवरून खालीं उतरला आणि मोठ्या प्रसंगांतून विलक्षण अपूर्वाईनें पार पडला, येवढें त्याच्या घोड्यानें पाहिलें आणि त्याच वेळीं तो खालीं पडला व प्राण सोडिता झाला. प्रतापसिंगाची या चित्तक घोड्यावर फारच प्रीति असून, प्रीति ठेवण्यासारखी त्यानें आपल्या यजमानाची चाकरीही जिवाविशेष केली होती. जेथें हा घोडा पडला तेथें त्याचे स्मरणार्थ प्रतापानें एक थडगें[1] बांधिलें आहे. या घोड्याच्या अनेक प्रसंगींच्या शौर्याचे कृत्यांचीं चित्रें उदेपूर राजधानींत लोकांच्या घरांत भिंतींवर काढलेलीं अजून आढळतात. त्यांत, तो घोडा यजमानास घेऊन कोठें दाट झाडींतून व जंगलांतून जात आहे, कोठें शत्रूंनीं लगट केली असतां पुढें आलेल्या दुथडीनें भरून जाणाऱ्या ओढ्यवांरून उडी मारून पार पडत आहे, व कोठें सेलिमाच्या हत्तीवर पाय देऊन उभा आहे, असे नानाप्रकारचे देखावे दाखविलेले आहेत. राजे लोकांच्या पदरीं प्रत्येक वस्तु निवडक असावी ती याकरितांच. अस्तु.

पुढें, सूक्तानें सेलिमास जाऊन खबर दिली कीं, 'प्रतापाचे मागें जे लोक लागले होते त्या सर्वांस त्यानें मारून टाकिलें.' परंतु सेलिमाला तेव्हांच संशय आला कीं, 'एकट्या प्रतापाचे हातानें हें काम झालें नसावें; यांत खुद्द सूक्ताची कांहीं तरी त्याला मदत असावी. प्रसंगीं भावाबद्दल मनांत कळवळा येऊन यानें त्याला साह्य

---

१. जारोळ गांवाजवळ 'चित्तकका चबुतरा' ह्मणून वरील थडगें अजून कायम आहे.

केलें असावें.' त्याच्या मनांत असा संशय येऊन त्यानें त्याला सांगितलें कीं, 'तूं खरें सांग, तुला अभयवचन आहे. तूं प्रतापसिंगाला मदत केलीस कीं नाहीं?' अभयवचन ऐकिल्यावर मग सूक्तानें जी खरी गोष्ट घडली ती सर्व इत्थंभूत सेलिमाला सांगितली. तो ह्मणाला, 'माझा भाऊ घोड्यावर बसून एकटा पळत जांत होता हें पाहून त्याला संकटांतून मुक्त केल्याशिवाय माझ्यानें राहवेना, ह्मणून मी जाऊन त्याला संकटमुक्त केलें.' हें ऐकून सेलिमाला फार राग आला. परंतु अगोदर त्याला अभयवचन देऊन गुंतला होता, त्यामुळें त्याचा कांहीं उपाय चालेना. तरी पुढें त्यानें त्याचेकडून आपल्या फौजेंतील मुख्य अधिकाराची जागा काढून घेतली. तेव्हां, त्याला हा अपमान सहन न होऊन तो सेलिमाचा पक्ष सोडून भावाकडे येऊन मिळाला. भावाला मोठ्या कठिण प्रसंगीं साह्य केल्यामुळें, त्याजवर प्रतापाचेंही प्रेम जडलेंच होतें. बरें, तो आला तो तरी नुस्ता हात हालवीत भावाकडे आला नाहीं. तर, त्यानें मोठ्या शिताफीनें भाइन्सरोर नांवाचा एक किल्ला व गांव मोंगलांपासून घेऊन त्याला बंधुप्रीतीनें नजर केला व नंतर त्यानें आपल्यावर कृपादृष्टि करावी ह्मणून सूक्तानें प्रतापसिंगाची विनंति केली. ह्याप्रमाणें तो त्याला येऊन मिळाल्यावर प्रतापसिंगानें त्याला आपला सेनानायक केलें व जो गांव आणि किल्ला त्यानें मिळवून त्याला नजर केला होता, तोच किल्ला व गांव त्याजकडे कायम करून तेथील आधिपत्य वंशपरंपरेनें त्याला दिलें. तेथें जो त्याचा वंश झाला त्याला 'सूक्तावत' असें ह्मणत. सूक्त हा शहाणपणानें बंधूला साह्य करून त्याजकडे आल्यावरून मेवाडच्या भाटांनीं आपल्या कवितेंत त्याजबद्दल मोठें वर्णन केलें आहे. व त्यांनीं त्याला 'खोरासानी-मुलतानीका अग्गल' ह्मणजे 'खोरासान आणि मुलतान यांना अडथळा करणारा,' असें ह्मटलें आहे. याचा अर्थ असा कीं, प्रतापसिंगाचे मार्गे जे दोघे मोंगल लागले होते ह्मणून वर सांगितलें, ते खोरासान व मुलतान येथून आलेले असून त्यांना सूक्तानें मारिलें व येणेंकरून प्रतापाचें मोठ्या बाणीच्या वेळेस संरक्षण होऊन तोच सूक्ताच्या बंधुप्रीतिदर्शनाचा सुप्रसंग घडला; व ह्मणून त्या अर्थाचें दर्शक असें वरील अल्पविस्तरबह्वर्थ नांव भाटांनीं त्यास दिलें आहे व तें योग्य आहे.

पुढें श्रावण शुद्ध ७, वि० सं० १६३२, ह्मणजे, इ० स० १५७६ या दिवशीं सेलिमानें पुनः प्रतापसिंगाचे फौजेची कत्तल उडवून दिली. हा दिवस ह्मणजे मेवाडच्या इतिहासांत लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. ही कत्तल हळदीघांटाचे वाटेवर झाली. ह्या कत्तलींत राण्याचे जवळचे नातलग व इतर ठाकूर, रांजे वगैरे निवडक पांचशें लोक ठार झाले. त्यामध्येंच ग्वाल्हेरचा पदभ्रष्ट राजा रामसा तुवर, ज्याला

बाबरानें ग्वाल्हेरीहून हांकून लाविल्यामुळें तेव्हांपासून जो मेवाडांत येऊन राण्याचे आश्रयानें राहिला होता, तो[१], त्याचा मुलगा खंडेराव, आणि त्याचे तुवर कुळांतले आप्तसंबंधी व सगेसोयरे वगैरे साडेतीनशें लोक, असे या कापाकापींत बळी पडले. आणि त्याचप्रमाणें झालावंशीय माना नांवाचा राजा, जो राण्याचा पुरा अभिमानी असून ज्यानें पूर्वी राण्याच्या बचावाकरितां आपल्याला समरभूमींत अर्पण केरून[२] घेतलें होतें, त्याचे लढवय्ये व शूर असे निवडक दीडशें लोक या कत्तलींत ठार झाले. यांशिवाय किती लोक मेले त्याची गणतीच नाहीं. या हळदीघांटच्या कत्तलीनें मेवाडांत घरोघर सर्व माणसें रडत होतीं. यावरून काय अनर्थप्रसंग गुजरला असेल तो सहज समजेलें[३].

पुढें पावसाळा लागल्यामुळें सेलिम यानें प्रतापाबरोबर डोंगरी मुलखांत झुंजण्याचें सोडून दिलें यामुळें प्रतापसिंगाला विसांवा सांपडला. पुढें पावसाळा गेल्या-

१. या राजाचे तैनातीचा दररोजचा खर्च १००० रुपये प्रतापराण्याला द्यावा लागे असा दाखला सांपडतो. यावरून राण्याचा त्याला कसा आश्रय होता हें समजेल व त्या आश्रयाप्रमाणें त्यानें राण्याकरितां आपलें जीवित अर्पण केलें ही त्याची कृतज्ञता होय.

२. हळदीघांटच्या पहिल्या लढाईंत सेलिमाला हौद्यांत असतां मारण्याचा प्रयत्न प्रतापसिंगानें केल्यावर, त्याच्या राजछत्राचे नेहमींच्या खुणेवर जे मोंगलांनीं तीन चार वेळ हल्ले केले ह्मणून वर सांगितलें आहे, त्यांत एके बाणीच्या प्रसंगीं या झालावंशीय मानानें अशी समयसूचकता आणि प्रसंगावधान दाखविलें कीं, राजछत्राखालीं असलेल्या प्रतापसिंगावर मोंगल धांवून येत असून त्याचें रक्षण होण्यास दुसरा कांहीं मार्ग नव्हता असे पाहून झटकर त्यानें प्रतापसिंगाला मागें सारिलें; व त्याच्या सूर्यचिन्हाच्या सोनेरी छत्राखालीं आपण उभा राहून त्या झटापटींत मारला गेला! येणेंकरून प्रतापसिंग अव्हीबात बचावला. झाला याचे या स्वामीभक्तीमुळें पुढें त्याचे वंशजांस राणा प्रतापसिंग यानें 'राजा' असा किताब देऊन साद्री परगणा व नौबतीचा मान दिला. तो अद्यापि त्यांजकडे चालला आहे. नौबतीचा मान ह्मणजे, राण्याचे राजमंदिराजवळ आलें असतां कोणत्याही सरदारास किंवा मानकऱ्यास आपल्या बरोबरची नौबत वाजविण्याची परवानगी नसते, परंतु ह्या मुद्दाम दिलेल्या नौबतीच्या मानकऱ्यांस राजवाड्याजवळही नौबत वाजविण्याचा हक्क असतो.

३. हळदीघांटच्या पहिल्या लढाईत प्रतापसिंगाकडे २२००० लोक होते; पैकीं त्यांतून ८००० मात्र शिलक राहिले. ह्या उभय प्रसंगी मोंगलांकडे तोफा व उंटांवरच्या जेजाला होत्या. मोंगलांप्रमाणेंच रजपुतांचीही सैन्यसंबंधी व्यवस्था होती, आणि त्यामुळें त्या दोन्ही पक्षांच्या सरासरीनें बरोबरीच होत. मोंगल व मराठे यांच्याही फौजांची साधारणत: एकसारखीच रचना व व्यवस्था असल्यामुळें त्या दोघांकडे जयापजय बहुश: सारखेच येत. दोन्ही पक्ष एकसारख्याच कसबाचे व व्यवस्थेचे असले ह्मणजे त्या लढायांची बरोबरी दिसते. पुढें, युरोपिअन लोकांचें युद्धकौशल्य इकडे आल्यावर इकडील लढाया व युद्धें गैबती दिसूं लागलीं व त्यांचें अनुकरण किंवा साह्य इकडील राजांस घ्यावें लागलें तेव्हां निभाव होऊं लागला. परंतु यांत आश्चर्य नाहीं.

वर माघ शुद्ध ७, वि० सं० १६३३, ह्मणजे, इ० स० १५७७, या दिवशीं सेलिमानें पुन: आपली फौज आणून कुमळमेर किल्ला घेतला. हा किल्ला राखण्याकरितां प्रतापसिंगानें पुष्कळ दिवस दमानें लढाई केली; परंतु तेथें एक नोगण नांवाची विहीर असून त्या विहिरीचे पाण्यावर सर्वांचा निर्वाह होत असे, त्या विहिरीचें पाणीच कोणीं नासून टाकिलें, त्यामुळें त्याला तो किल्ला सोडून देणें भाग झालें. व ह्याप्रमाणें तो किल्ला घेण्याचें श्रेय सेलिमाचा सरदार शहाबाजखान कोका यास मिळालें. वरील विहिरीचें पाणी कोणीं नासिलें याचा तपास पुढें लागला व तें कृत्य अबूचा राजा देवरा यानें केलें समजलें. तो पूर्वींपासून अकबराकडे मिळाला होता व या वेळीं त्याणें हें त्याला असें साह्य केलें. प्रतापसिंग कुमळमेर सोडून चोंड संस्थानांत गेला; व मागें सोनीगडचा ठाकूर भाण यानें अखेरपर्यंत शत्रूंशीं लढून कुमळमेराचें रक्षण केलें. परंतु शेवटीं तो मारला गेला. याच वेळीं मेवाडांतील एक प्रमुख भाटही भाणाबरोबर मारला गेला. या भाटाची त्याच्या कवित्वाविषयीं फार ख्याति आहे. रजपूत लढवय्यांबरोबर त्यांना प्रोत्साहन देणारे व त्यांच्या शूर पूर्वजांचे पराक्रम आणि गुणानुवाद गाणारे भाट लोक लढायांमधून नेहमीं असत; त्याप्रमाणें हाही भाट प्रतापसिंगाच्या फौजेबरोबर असून, तो मुद्दाम मागें भाणाबरोबर राहिला होता. परंतु तो मारला गेला. त्याच्या कविता व गीतें मेवाडांतील प्रत्येक मनुष्याच्या तोंडीं आहेत. हा सुप्रसिद्ध भाट मेला तरी त्याच्या कवितेंतील वीररस अजून जीवंतच आहे, असें तिकडील लोकांचें ह्मणणें आहे. त्यानें प्रतापाच्या खऱ्या स्वदेशाभिमानाचें आपल्या कवितेंत जें वर्णन केलें आहे तें इतकें रसभरित व यथार्थ केलें आहे कीं, त्या वेळीं प्रतापाशीं बेइमान होऊन अकबराकडे फितूर झालेले रजपूत राजे आणि प्रतापाचे दुस्मान मोंगल लोक हे देखील तीं गीतें व त्या कविता मोठ्या प्रेमानें आणि उत्साहानें ह्मणत.

कुमळमेर शत्रूंकडे गेल्यावर त्यांचा पक्ष जरा जोरवान् झाला. तेव्हां राजा मानसिंग यानें धरमेती आणि गोगुंडा हे दोन किल्ले घेतले आणि फरीदखान यानें छप्पन नांवाच्या प्रांतावर हल्ला केला. या छप्पन प्रांतांतच वर सांगितलेलें चोंडा संस्थान असून तेथें प्रतापसिंग आश्रय करून राहिला होता. पण तेथेंही फरीदखानाची फौज जाऊन पोहोंचली व तिनें त्याला वेढा दिला. ह्याप्रमाणें प्रतापसिंगाला चोहोंकडून मोठी अडचण पडली. त्याला आश्रयाई अशी जागा कोठेंही राहिली नाहीं. जिकडे तो जाई तिकडे मोंगल आपले त्याचे पाठीवर असतच. तथापि तो धैर्य धरून, आपणाला धरावयास आलेल्या फौजेवर न कळत जाऊन हल्ला करी. त्यानें संधि साधून पटकर उंच ठिकाणीं जाऊन आपलें निशाण उभारावें,

कीं, त्याचे लोक त्या ठिकाणीं जमून त्यांनीं खालीं दऱ्यांतून व लवणांतून, प्रतापसिंगाचा पाठलाग करणाऱ्या मुसलमानांवर हल्ला करावा आणि त्यांस कापून टाकावें. त्याप्रमाणें त्याणें क्रम चालविला. एके वेळीं, फरीद याचे मनांत प्रतापसिंगाला धरावें असें फार होतें; ह्मणून तो आपली फौज घेऊन, प्रतापाचे मागें लागला. तों प्रतापानें त्याला हुलकावीत हुलकावीत बरेंच आडरानांत नेलें; आणि तेथें गांठून त्याचे सर्व लोक मारून टाकिले. मुसलमानांस डोंगरी मुलखांतून आणि आडरानांतून फिरून अशा लढाया करण्याचा पहिल्यापासूनच सराव नसल्यामुळें अशा प्रसंगीं ते दीन होऊन मृत्युमुखीं पडत; व त्याप्रमाणें वरील प्रसंगीं स्थिति झाली. तेव्हां, सेलिमाचे लोक सर्व भ्याले; आणि इतकें असूनही लढाई करावी तर पाऊस पडून जिकडे तिकडे सर्व नद्या व ओढे नाले भरून गेले, आणि कित्येकांस जरीमरीचा वाखा झाला; ह्मणून लढाई तहकूब केली. पावसाळ्याचे दिवस आले ह्मणजे प्रतापसिंगाला विसांवा मिळे येवढें मात्र बरें होई.

ह्याप्रमाणें कित्येक वर्षें क्रम चालला होता व प्रतिवर्षीं त्याचें दारिद्र्य आणि दुर्दैव हीं वाढत चाललीं होतीं. त्यांतही त्याला स्वकुटुंबाविषयीं विशेष काळजी असे. कीं, त्यांजवर शत्रूचा हल्ला येऊं नये व शत्रूला तीं सांपडूं नयेत. कितीएक वेळां त्याचीं मुलें माणसें भिल्लांनीं जावडा येथील कथलाचे खाणींत लपवून तेथें त्यांचें रक्षण केलें होतें. आणि कित्येक प्रसंगीं तर त्या मुलांबाळांचें उघड मैदानांत व दरीखिंडींत वाघ आणि लांडगे यांजपासून रक्षण व्हावें ह्मणून, त्यांना टोपल्यांत घालून, ते विपत्कालचे पाळणे जावडा आणि चोंड येथील रानांवनांतून असलेल्या ज्या झाडांस टांगून ठेवीत असत, तीं झाडें व तीं स्थलें अजून दाखवितात व तेथें अजून ते राजकुलांतील बालकांचे पाळणे टांगल्याचे सांखळदंड असलेले दिसतात. असु. अशाही विपत्तिवातांनीं त्याच्या दृढनिश्चयाचें आणि स्वजात्यभिमानाचें तारूं यत्किंचित् तरी डगलें काय? नाहीं. जों जों संकटें आणि विपत्ति यांचें काहूर त्याजवर येई तों तों त्याच्या स्वोन्नतिरूप आशावृक्षाला ज्यास्त ज्यास्त टवटवी येई! त्याच्या अनुयायांची त्याजवर अत्यंत प्रीति असून ते त्याजकरितां जीवावर उदार होऊन वाटेल तें करण्यास तयार होते. असें असतां, अकबरानें गुप्तपणें आपला एक हेर रजपुताचे वेषानें प्रतापाची स्थिति व व्यवस्था कशी काय आहे ती बघण्याकरितां पाठविला होता. त्याणें प्रतापसिंगाचे कडचा सर्व प्रकार टेहळून बादशाहाला जाऊन सांगितलें कीं, 'राणा रानावनांत फिरत असून मोठ्या आपत्तींत आहे; तरी, त्याचा सन्मान त्याचे लोक फार करितात व त्याजविषयीं त्यांना अभिमान आहे. राण्याच्या